The Department of Public Instruction, Bombay.

# THE LIFE

OF THE

# DUKE OF WELLINGTON.

COMPILED FROM ENGLISH WORKS,

BY



VINÁYAK KONDDEO OKE.

3,000 Copies.



Bombay:
GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÓT.

1876.



*Price Nine Annas.*

# प्रस्तावना.



सांप्रत कालीं इंग्लंद देशास जी उत्तम स्थिति प्राप्त झाली आहे, तिचीं कारणें नानाविध आहेत. त्यांमध्यें, स्वदेशाचें हित करणें हेंच आपल्या जन्माचें सार्थक्य, असें समजणारे, आणि हातीं घेतलेलें काम दृढनिश्चयेंकरून शेवटास नेणारे असे पुरुष त्यामध्यें होऊन गेले, हें एक आहे. असे पुरुष निर्माण होणें ही गोष्ट केवळ परमेश्वराधीन आहे. परंतु, असे पुरुष उत्पन्न झाल्या शिवाय राष्ट्रास ऊर्जित दशा प्राप्त होत नाहीं, हें पूर्णपणें समजून, प्रत्येक देशांतले लोक अशा विभूतींची निरंतर इच्छा करीत असतात. अशा प्रकारच्या व्यक्तींपैकींच ड्यूक आफ वेलिंग्तन हा पुरुष होऊन गेला. ह्याचें नांव घेतल्याबरोबर पूज्यभावपूर्वक मस्तक डोलविणार नाहीं, असा एक देखील इंग्लिश गृहस्थ सांपडावयाचा नाहीं. त्याचें हें चरित्र अनेक इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें लिहिलें आहे. ह्याच्या अवलोकनानें वाचणाऱ्यांच्या मनाचें रंजन होवो, अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. ती तो सफल करो.

अहमदनगर,

तारीख ५ मे, सन १८७५. इ०.

# अनुक्रमणिका.

## भाग पहिला.



## भाग दुसरा.



## भाग तिसरा.

## भाग चवथा.



## भाग पांचवा.

# ड्यूक आफ् वेलिंग्तन ह्याचें चरित्र.

## भाग पहिला.

अर्वाचीन कालीं युरोपखंडामध्यें जे महापराक्रमी योद्धे होऊन गेले, त्यांतील उत्तमांमध्यें ड्यूक आफ् वेलिंग्तन ह्याची गणना आहे. ज्या नापोलियन बोनापार्तानें आपल्या विलक्षण शौर्येंकरून कांहीं वर्षेंपर्यंत सगळें जुनें महाद्वीप अगदीं हालवून टाकिलें होतें, त्याचा पराभव केल्यावरून ह्या पुरुषाचें नांव सर्व जगांत प्रसिद्ध आणि स्वदेशाभिमानी पुरुषांस वंद्य असें झालें आहे. ह्याचें चरित्र फार मनोरम आहे. तें लिहिण्यास आतां आह्मी आरंभ करितों.

ड्यूक आफ् वेलिंग्तन ह्याचें मूळचें नांव आर्थर वेल्सली असे होतें. ह्याचें जन्म इ० स० १७६९ च्या मे महिन्याच्या पहिल्या तारखेस ऐर्लंद देशामध्यें मीथ प्रांतांत दांगनक्यासल येथें झालें. नापोलियन बोनापार्त हा ह्याच वर्षीं भूमध्य समुद्रामध्यें कोर्सिका बेटांत जन्मला. हे एकमेकांस पुरून उरण्यासारखे पराक्रमी पुरुष एकाच वर्षीं जन्मास आले, ही चमत्कारिक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आर्थर वेल्सली ह्याचा बाप इ० स० १७८१ त निवर्तला. इतक्या अल्प वयामध्यें बाप मरणें ही मुलाची मोठी हानि आहे. ती आर्थर वेल्सली ह्याच्या वांट्यास आली. तथापि तिच्या

योगानें त्याच्या लहानपणच्या कर्तव्य कर्मास ह्मणजे विद्याभ्यासास फारसा व्यत्यय आला नाहीं. ह्याचें कारण एवढेंच कीं, त्याची आई ही स्वतः मोठी शिकलेली, हुशार, उद्योगी, आणि आपल्या मुलांच्या हिताविषयीं परमदक्ष अशी होती. तिनें त्याला कांहीं कमी पडूं दिलें नाहीं. स्त्रीशिक्षणापासून जे अनेक लाभ होतात, त्यांमध्यें विद्याभ्यासाचे कामीं मुलांस आईचें उत्तम साह्य मिळणें हा विशेष महत्वाचा आहे. आर्थर वेल्सली ह्यास प्रथम एतन येथील शाळेंत घातलें, आणि मग ब्रैतनच्या शाळेंत ठेविलें. त्या शाळा फार नामांकित आहेत. त्यांजमध्यें अभ्यास केलेले तरूण पुरुष मोठ्या योग्यतेस चढल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. त्या शाळांमध्यें आर्थर वेल्सली ह्याचा बराच अभ्यास झाला. तरी, व्याकरण, अलंकार, भाषेची मार्मिकता, ग्रंथलेखन, इत्यादिकांमध्यें जशी त्याची बुद्धि चालावी अशी त्याच्या मर्मज्ञ आणि सूक्ष्मदृष्टि मातुश्रीची इच्छा होती, तशी चालत नाहीं असें तिला वाटल्यावरून, तिनें त्याला लष्करी कामांत तबेज करण्याचें मनांत आणिलें; आणि त्याप्रमाणें त्यास फ्रान्सदेशामध्यें आंजर्स येथें युद्धविद्या पढविण्याची जी मोठी पाठशाळा होती तिजमध्यें घातलें. तेथें देखील त्यानें मोठेंसें नांव मिळविलें नाहीं. तथापि त्या शाळेमध्यें असतां तो अहर्निश उद्योग करीत असे, असें एके ठिकाणीं सांगितलें आहे. ह्या शाळेमध्यें त्यानें साहा वर्षें घालविलीं. नंतर त्याला ७३ व्या पलटणीमध्यें एक एन्साइनीची जागा मिळाली. तेव्हां तो अठरा वर्षांचा होता. तो स्वतः बराच चलाख होता, आणि त्याच्या भावाला सरकारामध्यें मोठें काम मिळालेलें असून त्याचें चोहींकडे फार वजन होतें; तेणेंकरून आर्थर वेल्सली

ह्यास भराभर वढतीच्या जागा मिळत गेल्या, आणि तो कोणी चांगला होतकरू मनुष्य आहे, अशी त्याची आख्या झाली. इ० स० १७९० त त्याला ऐरिश पार्लमेंतामध्यें सभासद नेमिलें, आणि इ० स० १७९२ त ३३ व्या पलटणीमध्यें त्यास कर्नलचा अधिकार प्राप्त झाला. एकादें मोठें कृत्य साहजिक झालें असलें, तरी तें केल्याच्या मानाविषयीं आपला हक्क स्थापण्याचा प्रयत्न करण्याची रीति जनांमध्यें आहे. त्याप्रमाणें आर्थर वेल्सली हा जेव्हां पुढें जगविख्यात योद्धा झाला तेव्हां, हलक्या पायरी पासून मोठा हुद्दा मिळे तोंपर्यंत थोडथोडे दिवस तो ज्या ज्या पलटणींमध्यें होता, त्यांतली प्रत्येक पलटण हा शूर पुरुष आपण तयार केल्याच्या मानाविषयीं हक्क दाखवूं लागली. वास्तविक पाहिलें असतां असे असाधारण पुरुष निपजण्यास शालादिकांतील शिक्षणापेक्षां त्यांचे आंगचे उपजतगुण विशेष कारणभूत असतात. ही गोष्ट शूर पुरुषांचीं चरित्रें पाहिलीं असतां सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

इ० स० १७९४ त कर्नल वेल्सली हा सव्वीस वर्षांचा झाला. तत्पूर्वींच फ्रान्स आणि इंग्लंद ह्यांचें युद्ध जुंपलें होतें. त्यामध्यें इंग्लंदचें जें सैन्य गुंतलें होतें त्याचें आधिपत्य डूक आफ् यार्क ह्या राजकुमाराकडे होतें; आणखी त्याचे हाताखालीं पुष्कळ लहान मोठे अमलदार होते. हें तुमुल युद्ध त्या सुमारास फ्लांदर्सांत चाललें होतें; आणि इंग्लिश सैन्याचें पाऊल घडोघडी मागें पडत होतें. अशा स्थितीमध्यें एकाद्याचें शौर्य आणि शाहाणपण प्रकट होण्यास फारसे प्रसंग येत नसतात. परंतु, डूक आफ् यार्क ह्याच्या सैन्यास सरकारच्या हुकुमाप्रमाणें तो जाऊन मिळाल्यावर, त्या अडचणीच्या वेळीं

देखील कर्नल वेल्सली ह्यानें आपली हुशारी दाखविली, आणि मुख्य सेनापतीची शाबासकी मिळविली. इंग्लिश सैन्य पराभव पावून परत जात असतां त्याच्या पिछाडीचें रक्षण करण्याचें काम आर्थर वेल्सली ह्याजवर सोंपिलें होतें. तें बजावीत असतां शत्रु त्याच्या हाताखालच्या लोकांवर वारंवार हल्ले करीत असत. त्यामुळें त्यास फार त्रास होई, आणि कधीं कधीं मोठें भय पडे. तरी, त्यानें मोठ्या धैर्यानें आणि विचारानें ते प्रसंग काढिले.

ह्या मोहिमीवर गेलेलें सैन्य इ० स० १७९५ त इंग्लंदास परत आलें. त्याबरोबर आर्थर वेल्सलीही तेथें आला. त्यास आणि त्याच्या ३३ व्या पलटणीस कांहीं दिवस विसांवा मिळाल्यावर, त्यांस वेस्तइंदीज बेटांमध्यें जाण्याविषयीं सरकारचा हुकूम झाला. त्याप्रमाणें त्यांची सगळी तयारी झाली, आणि ते गलबतांत बसले. इतक्यांत असें मोठें भयंकर वादळ सुटलें कीं, त्याच्या योगानें कर्नल आर्थर वेल्सली आणि त्याचे लोक ह्यांस गलबतांतून उतरून घरीं परत जावें लागलें. ह्या प्रकारेंकरून वेस्त इंदीजकडे त्यांचें जाणें राहिलें. पुढें इ० स० १७९६ च्या वसंतऋतूमध्यें त्यांस बंगाल्यास जाण्याकरितां गलबतांत बसण्याविषयीं सरकारानें हुकूम दिला. त्या संधीस कर्नल आर्थर वेल्सली हा एकाएकीं इतका आजारी पडला कीं, त्याच्यानें त्या पलटणीबरोबर निघवेना. तेव्हां त्याची पलटण गलबतांत बसून बंगाल्याकडे निघून गेली. नंतर कांहीं दिवसांनीं चांगला बरा झाल्यावर, कर्नल आर्थर वेल्सली हा दुसऱ्या एका गलबतांत बसून इंग्लंदाहून निघाला, आणि, आफ्रिकेचें दक्षिणेकडचें टोंक केप आफ् गुदहोप येथें आपल्या

पलटणीस येऊन मिळाला. ही पलटण इ० स० १७९७ च्या फेब्रुवारी महिन्यांत कलकत्ता येथें येऊन पोहोंचली.

आर्थर वेल्सली हिंदुस्थानांत आला तेव्हां त्याचें नांव इकडे गाजण्याचें कांहीं एक चिन्ह दिसत नव्हतें. परंतु, त्याची कीर्ति इकडे चिरकाल राहावी, असा ईश्वरी संकेत होता; त्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या. प्रसंगावांचून मनुष्याचे गुणावगुण दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. औदार्य आणि शौर्य हे गुण प्रदर्शित करण्यास सधनता आणि युद्धप्रसंग हीं आवश्यक आहेत. कितीएक गुण प्रदर्शित होण्यास तर वशीला लागतो. त्यांतलाच शौर्य हा एक गुण आहे. पहा, तुमुल युद्ध माजलें आहे; एका पक्षावर कठीण वेळ येऊन ठेपली आहे; त्यांतले बहुतेक सर्व लोक अगदीं गांगरून गेले आहेत; आणि त्यांमध्यें, दैववशात्, एका साधारण शिपायाच्या मनामध्यें, स्वपक्षास जय प्राप्त करूनघेण्याची एक विलक्षण युक्ति येऊन ती खचीत सिद्धीस नेण्याची वीरश्री स्फुरण पावली आहे; परंतु योग्यतेच्या कमीपणामुळें आणि वशील्याच्या वाणीमुळें जर त्याला कोणी पुढें सरकूं देत नाहीं, अथवा त्याचें कोणी ऐकत नाहीं, तर, त्याच्या त्या गुणाची योग्यता कधींही बाहेर पडावयाची नाहीं. त्या गुणापासून त्याचें किंवा त्याच्या देशाचें हित कधींही व्हावयाचें नाहीं. हिमालयावरचीं अत्युत्तम सुवासिक फुलें आणि अमृता सारख्या मधुर रसानें भरलेलीं फळें, मनुष्याच्या वस्तीपासून फार दूर असल्यामुळें, जशीं जागच्याजागीं कुजून नाहींतशीं होतात, त्याप्रमाणें, तो गुण कोणाच्याही उपयोगीं न पडतां त्या मनुष्याबरोबर लयास जावयाचा. तसें आर्थर वेल्सली ह्याचें झालें नाहीं. तो हिं-

दुस्थानांत आला त्या वेळीं जिकडेतिकडे बरीच स्वस्थता होती. दिल्लीच्या नामधारी बादशाहाच्या हातीं कांहीं राहिलें नव्हतें, तरी तो आपणास राजा ह्मणवीत असे; अयोध्या प्रांताचा कांहीं भाग इंग्लिशांनीं पूर्वींच घेतला होता; बंगाला तर त्यांचाच होता; कर्नाटक त्यांच्या ताब्यांत आलें होतें; आणि शिंदे, होळकर, गायकवाड, निजाम, पेशवे, इत्यादि राजे, आपापल्या ठिकाणीं मोठ्या बंदोबस्तानें राहून इंग्लिश सरकाराशीं जरा ऐटीनें, परंतु फार सावधगिरीनें वागत असत. इ० स० १७६१ त इंग्लिश लोकांनीं फ्रेंचांची खूब खोड मोडिली होती, तरी ते आंतून आंतून एतद्देशीय राजांस साह्य करण्यास त्यांजपाशीं राहिले होते. त्यांचा एक मुख्य सरदार एम्. रेमंद हा, आपले देशचे १०० लहान लहान लष्करी कामदार घेऊन निजामाच्या लष्करांत होता; आणि शिंद्याकडे जनरल पेरन हा होता. त्या वेळीं फ्रेंच लोक आणि इंग्लिश लोक ह्यांचें अत्यंत वैमनस्य होतें. तेव्हां हे फ्रेंच सरदार इंग्लिश सरकारच्या डोळ्यांत सलत होते, हें उघडच आहे. तथापि, त्यांजकडे लक्ष देण्यास त्या वेळीं कांहीं कारण नव्हतें. परंतु, ह्मैसूरचा राजा टिपूसुलतान ह्यानें आपल्या राज्याच्या शेजारच्या मुलुखांत, कांहीं एक कारण नसतां, लुटालूट करून मोठी धुमाळी मांडिली होती. त्याचा संसर्ग इंग्लिश सरकारच्या मुलखाच्या प्रजेस लागूं लागला. तेव्हां त्याचा बंदोबस्त करण्याचा विचार करणें इंग्लिश सरकारास भाग पडलें. असें युद्धप्रसंगाचें कारण उद्भवलें; आणि ह्याच वेळेच्या सुमारास आर्थर वेल्सली ह्याचा वडील भाऊ मार्क्किस आफ वेल्सली हा हिंदुस्थानाचा गव्हरनर जनरल होऊन

कलकत्त्यास आला; हा वशीला झाला; ह्यांच्या योगानें आर्थर वेल्सली ह्याचें शौर्य प्रकट झालें. मार्किस आफ् वेल्सली हाच लार्ड मार्निंग्टन ह्या नांवानें इतिहासामध्यें प्रसिद्ध आहे.

कर्नल आर्थर वेल्सली हिंदुस्थानांत पोहोंचल्यावर थोडक्याच दिवसांनीं इंग्लिश सरकाराचें आणि टिपुसुलतानाचें युद्ध जुंपलें. त्या प्रसंगीं हिंदुस्थानांतलें इंग्लिशांचें बहुतेक सैन्य मद्रास इलाख्यामध्यें जमविलें होतें. तेव्हां कर्नल वेल्सली ह्यासही आपल्या पलटणींसहवर्तमान तेथें यावें लागलें. मद्रासचा इंग्लिशांचा मुख्य सेनापति जनरल हारिस हा होता. त्यानें कर्नल वेल्सली ह्यास पलटणींसुद्धां वळजाबाद येथें राहण्यास हुकूम दिला. त्याप्रमाणें तो तेथें जाऊन लढाईवर जाण्याची कवायतीची वगैरे तयारी करूं लागला. तसे बाकीचे सरदारही आपापल्या नियमित स्थलीं छावण्या देऊन युद्धास जाण्याची सिद्धता करण्याचे कामीं मग्न झाले. अशी कडीकोट तयारी होती, तरी खजीन्यांत पैशाची कमताई असल्यामुळें, आणि सर जान शोर ह्याच्या विलक्षण राज्यरीतीनें एतद्देशीय संस्थानिकांच्या आचरणांत जी धरसोड उत्पन्न झाली होती तीमुळें, मद्रासचा गव्हरनर लार्ड होबर्त ह्याचें चित्त अस्वस्थ होतें; आणि, इंग्लिशांकडचें एकंदर सैन्य कायतें १४,०००, त्यांत गोरे लोक अवघे ४,०००; आणि हें १४,००० सैन्य टिपूसुलतानाच्या ७०,००० सैन्याशीं लढण्यास समरांगणीं उभें करावयाचें;—अशा अनेक विचारांनीं त्याचें मन व्यग्र झालें होतें. तरी जो निश्चय केला आहे तो सोडावयाचा नाहीं, असा निर्धार करून, त्यानें तें तयारीचें काम तसेंच पुढें

चालविलें. ही इकडची सर्व हकीकत लार्ड मार्निंगतन, गव्हरनर जनरल ह्यास कळल्यावर त्यानें जनरल हारिस ह्यास असा हुकूम पाठविला कीं, तुह्मीं आपण होऊन टिपू सुलतानाच्या फौजेवर हल्ला करूं नये; तर, तुह्मीं आपल्या लष्करासहवर्तमान त्याच्या आणि आपल्या राज्यांच्या सरहद्दीवर मोठ्या सावधगिरीनें राहावें, आणि आपलें सैन्यबल वाढविण्याविषयींचा प्रयत्न अखंड चालवून, टिपू सुलतानाची हालचाल लक्षपूर्वक पहावी, आणि प्रसंगानुरूप विचारानें वर्तावें. जो अन्यायानें वर्तत असेल त्यास शासन करणें हें उचित आहे, तरी, तें शासन करण्यापुरतें सामर्थ्य आपले ठायीं सिद्ध आहे कीं नाहीं, हें अगोदर पाहिलें पाहिजे. हा विचार लार्ड मार्निंगतन ह्याचे ठायीं नेहमीं जागृत असे, असें त्याच्या एकंदर सगळ्या कारकीर्दीवरून दिसून येतें.

कर्नल वेल्सली ह्यास वळजाबादेस ठेविल्याविषयीं वर लिहिलें आहे. तेथें त्यानें अतिशयित परिश्रम करून, आपले हाताखालचे लोक युद्धाच्या कामांत इतके प्रवीण केले कीं, पुढें थोडक्याच दिवसांनीं टिपू सुलतानाच्या सैन्याशीं जागोजाग जे प्रसंग झाले, त्यांमध्यें त्यानें व त्याच्या लोकांनीं मोठी बाहादारी मिळविली, आणि सरकारानें त्यांस मोठी शाबासकी दिली. नंतर, आपल्या सर्व सैन्यासहवर्तमान ह्मैसूरच्या भयंकर वाघाच्या मागें लागण्यास जेव्हां इंग्लिश सरदार मोठ्या तयारीनें निघाले, तेव्हां कर्नल वेल्सली ह्याचे हाताखालीं त्याची ३३ वी पलटण, शिवाय दुसरे थोडेसे गोरे लोक, आणि निजामाकडचें कांहीं सैन्य, इतकी सेना दिली, आणि, ती सेना त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें वागवून, तिजसहवर्तमान शत्रूवर जाऊन त्याचा मोड करावा, आणि आपला

पराक्रम दाखवावा, असा त्यास सरकारानें हुकूम केला. ह्या स्वारीमध्यें जनरल हारिस, बेर्द, कातन, दालस, ब्रौन, फ्लाइद, मालकम असे आणखी कितीएक नामांकित सरदार होते.

इ० स० १७९९ च्या फेब्रुआरी महिन्यामध्यें इंग्लिश सरकारचें सैन्य टिपूसुलतानाच्या राज्यांत शिरलें. तेव्हां वाहनांची वगैरे सर्व तयारी जरी फार चांगली होती, तरी लष्कराची मजल दररोज तीन कोसांहून अधिक होत नसे. ह्यावरून वाट किती अडचणीची होती, ह्याचें सहज अनुमान करितां येतें. तसेंच, पूर्वेकडच्या सैन्यभागांतलें वर्तमान पश्चिमेकडच्या सैन्यभागास पोहोंचण्यास तीन वार लागत, अशी स्थिति होती. इंग्लिशांचें सैन्य आपल्या राज्यामध्यें प्राप्त झालें आहे, असें टिपूसुलतानास कळतांच तो आपल्या फौजेसहवर्तमान आपल्या राजधानींतून बाहेर पडला. त्यानें आपल्या लष्कराच्या टोळ्या चारी दिशांस इंग्लिशांच्या सैन्यावर हल्ला करण्यास पाठविल्या. आणि काननुराहून जी एक लहानशी इंग्लिश सैन्याची तुकडी त्याच्या राजधानीवर चालून येत होती, तिजवर आपण स्वतः गेला. ह्या लहान तुकडीचा आपण तेव्हांच पराभव करून टाकूं अशी टिपूसुलतानाला खातरी होती. परंतु ती व्यर्थ झाली. उलटें, त्यालाच पराजित होऊन मागें हटावें लागलें. नंतर मार्च महिन्याच्या २७ व्या तारखेस, श्रीरंगपट्टणापासून सुमारें पंधरा कोसांवर, मालवली येथें टिपूसुलतानाच्या सैन्याची आणि इंग्लिश सरकारच्या एकत्र झालेल्या मुख्य सैन्याची मोठी लढाई झाली. प्रथमतः टिपूच्या फौजेनें इंग्लिश सैन्याच्या उजव्या तुकडीवर हल्ला केला. तेव्हां फ्लाइद ह्यानें आपले घोडेस्वार बरोबर घेऊन शत्रूंवर अशी चाल केली कीं, तिच्या योगानें

ते भयभीत होऊन पळत सुटले. नंतर डावीकडची तुकडी कर्नल वेल्सली ह्याचे स्वाधीन केलेली होती, तिनें जो त्यांचा पाठलाग केला त्यामुळें त्यांस देमायधरणी ठाय झालें. त्यांस उभें राहण्यास देखील सुरक्षित जागा सांपडेना. अशी त्यांची दुर्दशा झाली. बिव्हरिज नामक एका ग्रंथकारानें ह्या लढाईच्या वर्णनांत असें लिहिलें आहे कीं, "ह्या प्रसंगीं शत्रूकडचे सुमारें एक हजार लोक पतन पावले; परंतु, इंग्लिशांकडचे फार थोडे जायां झाले." उभय पक्षांच्या नाशाचें प्रमाण कसेंही असो. परंतु, ह्या वेळीं टिपूच्या लोकांचा पराभव झाला, आणि इंग्लिश सैन्याचा जय झाला, ही गोष्ट खरी आहे. ह्या प्रसंगीं कर्नल वेल्सली ह्याचें विलक्षण युद्धकौशल्य दिसून आलें, आणि सरकारामध्यें त्याची मोठी वाहवा झाली.

मालवली येथें पराभव पावल्यावर, टिपूचें सर्व सैन्य श्रीरंगपट्टणाकडे परत आलें. तेव्हां, त्या शहरास वेढा घालून शत्रूस जर्जर करावें, असा इंग्लिश सरदारांनीं निश्चय केला. त्याप्रमाणें एप्रिल महिन्याच्या चवथ्या तारखेस इंग्लिशांचें सैन्य श्रीरंगपट्टणासमोर येऊन त्यास वेढा घालूं लागलें. किल्ल्यापासून बऱ्याच अंतरावर इंग्लिश फौजेचा तळ पडला होता; ह्या तळापासून किल्ल्यापर्यंत जी जागा होती, तिजमध्यें रानांनीं भरलेले असे कांहीं उंचवटे होते; आणि त्यांतल्या दऱ्या टिपूकडच्या लोकांस चांगल्या ठाऊक असल्यामुळें ते त्यांत दडून बसून इंग्लिश सैन्यांतील लोकांस वारंवार उपद्रव देत असत. आणखी दुसरें असें भय पडलें होतें कीं, हा उपद्रव जर अधिक वाढला, तर, तळावरचे लोक आणि वेढा घालणारे लोक ह्यांच्यामध्यें जें दळणवळण आहे तें नाहींसें

होऊन एकादा अनर्थ ओढवेल कीं काय नकळे. तेव्हां तें मधलें बिकट ठिकाण आधीं स्वाधीन करून घ्यावें, आणि मग वेढ्याचें काम झपाट्यानें चालवावें, असें जनरल हारिस ह्याच्या मनांत आलें. त्याप्रमाणें तें ठिकाण त्याच ह्मणजे चवथ्याच तारखेच्या रात्रीं शिड्या लावून वर चढून घेण्याविषयीं त्यानें जनरल बेर्द साहेब ह्यास हुकूम केला. तें काम त्या शूर सरदारानें लागलेंच बजाविलें. परंतु, दुसरे दिवशीं प्रातःकाळीं पुनः टिपूच्या लोकांनीं तें स्थल व्यापिलें, आणि पूर्ववत् उपद्रव मांडिला. तेव्हां, ३३ वी गोरी पलटण, कांहीं काळे लोक, आणि कर्नल शा ह्याच्या तुकडींतले लोक, इतकें सैन्य बरोबर घेऊन कर्नल वेल्सली ह्यानें त्या ठिकाणावर हल्ला करून तें घ्यावें, असा हुकूम झाला. हा हुकूम पोहोंचतांच कर्नल वेल्सली ह्यानें मुख्य सेनापति जनरल हारिस ह्यास एक चिठी पाठविली, ती येणेंप्रमाणें:—

"मुख्य सेनापति लेफ्टनंत जनरल हारिस साहेब.

मुकाम छावणी.

तारीख ५ माहे एप्रिल स० १७९९ इ०.

महाराज,

मीं कोठें कसें नाकें धरून राहावें आणि काय करावें, हें मला बरोबर समजत नाहीं. तें, आपण कृपा करून आज दुपारून क्षणभर त्या ठिकाणीं येऊन जर मला दाखवाल, तर मी आपला फार फार आभारी होईन. आपण तेथें याल तोंपर्यंत मी आपलें सैन्य अगदीं सिद्ध करून ठेवितों.

मी तो उंचवटा पाहून आतांच परत आलों. मला असें दिसून आलें कीं, नळाची बाजू जर आपले हातीं लागली,

तर तो उंचवटा घेण्यास आपणांस अगदीं देखील आयास पडावयाचे नाहींत. कारण, नळाच्या मागच्या बाजूस जवळच तो उंचवटा आहे. तथापि, आपल्या मर्जीस येईल तें खरें; आपल्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी सिद्ध आहें.

आपला अत्यंत विश्वासू सेवक,

**आर्थर वेल्सली.**"

ह्यावरून, आर्थर वेल्सलीं ह्यास आपले कामाची आस्था किती होती, आणि तो आपल्या वरिष्ठांशीं किती नम्रतेनें वर्तत असे, हें स्पष्ट दिसून येतें. ह्या पत्रांतल्या विनंतीप्रमाणें जनरल हारिस त्या ठिकाणीं येऊन आर्थर वेल्सली ह्यास भेटला होता कीं नव्हता, हें कोठें लिहिलेलें आढळत नाहीं. परंतु, पांचव्या तारखेच्या रात्रीं कर्नल वेल्सली ह्यानें जो त्या उंचवट्यावर हल्ला केला, तो अगदीं व्यर्थ गेला, आणि त्यास निमूटपणें मागें हटावें लागलें, ही गोष्ट खरी आहे. तें स्थळ फार अडचणीचें होतें, कर्नल आर्थर वेल्सली ह्यास त्याविषयीं कांहींएक माहिती मिळाली नव्हती, शत्रूकडचे लोक पुष्कळ होते, आणि अतिशयित अंधार पडला होता, हीं ह्या अपजयाचीं कारणें होत. अशा स्थितीमध्यें जर कोणीं जय मिळविला, तर त्याची शाबास खरी; व त्याची तारीफ करणे योग्य आहे; परंतु, अशा अवस्थेमध्यें जर कोणी पराभव पावला, तर तो विशेष दोषपात्र होत नाहीं. कांकीं, अशा प्रसंगीं अशा परकीय मनुष्यांचा सगळा भरंवसा बहुतकरून त्यांच्या बलावर, आणि मुख्यत्वेंकरून त्यांच्या नशीबावर असतो; ह्यांपैकीं बल कमी पडल्याबरोबर नशीब फिरतें, आणि विपरीत गोष्ट घडते. असाच

प्रकार कर्नल आर्थर वेल्सली ह्याचा झाला, ह्याविषयीं आणखी लिहिणें नलगे. रात्रीं पराभव झाला तरी, त्या शूरानें प्रातःकाळीं त्या स्थलावर हल्ला करून तें घेतलें. एका ग्रंथकारानें असें लिहिलें आहे कीं, सगळ्या जन्मांत ड्यूक आफ वेलिंग्टन ह्याचा एवढाच काय तो पराभव झाला.

छावणी आणि किल्ला ह्यांच्या मधील अवघड जागा कर्नल आर्थर वेल्सली ह्यानें हस्तगत करून घेतल्यावर, त्या दोन स्थलांचें दळणवळण निर्भयपणें चाललें, आणि वेढ्याच्या कामास विशेष उत्तेजन आलें. तयारी कडीकोट चालली होती, आणि टिपूकडचे लोक आपापले ठिकाणीं भयभीत झाले होते, तरी इंग्लिश सरदारांस जय प्राप्तीविषयीं मोठा संशय होता. त्याविषयीं ते एकमेकांशीं नानाप्रकारच्या गोष्टी सांगत. त्यांतली एक पुस्तकांतून लिहिली आहे. ती अशीः—किल्ल्यावर हल्ला करण्याचा जो दिवस नेमिला होता, त्या दिवशीं मालकम साहेब, मुख्य सेनापति जनरल हारिस ह्याच्या तंबूंत त्यास भेटावयास गेला. त्यांचे सलामसुलाम झाल्यावर, मालकम साहेब हारिस साहेबास ह्मणाला, "महाराज, आतां आपलें काय? आपण विजयी सेनापति!" त्यावर जनरल हारिस ह्यानें उत्तर केलें, "मालकम साहेब, ही अशा विनोदाची वेळ नव्हे. आपणांस एक फार मोठें काम करावयाचें आहे; आणि त्याचा समय जवळ येत चालला आहे. पहा, माझ्या तंबूच्यापुढें जो गोरा शिपायी पाहरा करीत आहे, तो क्षुधेनें आणि श्रमानें इतका रोड आणि अशक्त झाला आहे कीं, काळा शिपायी त्याला एका हिसक्यासरसा खालीं पाडील. हा श्रीरंगपट्टणचा किल्ला आपणांस घेतला पाहिजे एक, अथवा त्या कामीं मरून गेलें

पाहिजे एक; दुसरा उपाय नाहीं. काय होणें असेल तें होवो, तुह्मीं किल्ल्यावर हल्ला करण्याचें काम सोडूंनये, असा बेर्द साहेबास मीं हुकूम दिला आहे. तो जर पराभव पावून परत आला, तर, खंदकांतून आपलें सैन्य घेऊन कर्नल आर्थर वेल्सली ह्यास त्या कामावर गेलें पाहिजे; आणि त्यालाही जर यश न येईल, तर मीं स्वतः सैन्य घेऊन हल्ला करण्यास जाण्याचा निश्चय केला आहे. ह्या कामांत यश आलें तरच आपला बचाव होईल."

सर्व सिद्धता झाल्यावर जनरल बेर्द सैन्यासहवर्तमान हल्ला करावयास पुढें गेला. त्यास पावलोपावलीं यश मिळत चाललें. शेवटीं, तारीख ४ माहे मे रोजीं, किल्ल्याच्या भिंतीस मोठें थोरलें एक भगदाड पाडून, सुमारें दुपारच्या दोन वाजण्याच्या सुमारास, आपण पुढें होऊन, त्यानें त्यांतून आंत जातांना आपले लोकांस मोठ्या आवेशानें ह्मटलें, "या, माझ्या शूर शिपायांनो, माझ्या मागोमाग या; आणि आपण खरे शूर इंग्लिश शिपायी आहों असें सर्वांस दाखवा." हे शब्द ऐकतांच त्यांस फुरण चढलें. ते त्याजबरोबर मोठ्या आवेशानें चालले. हें बाहेरचें वर्तमान कळलें तेव्हां टिपू जेवायास बसला होता. इंग्लिश लोक खचीत तुटून पडले, असें पाहून तो आंचवून, आपल्या घोड्यावर बसून, आणि आपले गारदींचे, जीवास जीव देणारे, असे निवडक स्वार बरोबर घेऊन, इंग्लिश सैन्याशीं टक्कर दे-ण्यास तिकडे गेला. उभय पक्षांची बरीच मोठी झटापट झाली. तिजमध्यें तो सुलतान पडला; त्याच्या लोकांची दाणादाण झाली; आणि कर्नल आर्थर वेल्सली वगैरे अनेक इंग्लिश सरदार किल्ल्यांत शिरले. टिपू सुलतानाचीं बाय-

कामुळें राजवाड्यांत होतीं, त्यांस पाहून जनरल बेर्द ह्यास फार दया आली. वास्तविक ह्मटलें असतां, तो साहेब तीन वर्षें पर्यंत तेथील तुरुंगांत पराकाष्ठेचीं दुःखें सोशीत पडला होता, ह्याकरितां त्यास त्या गोष्टीचा सूड घेण्याविषयीं विशेष आवेश यावा. परंतु, त्याचें मन तसें नव्हतें. त्यास तीं सुलतानाचीं माणसें दीन पाहून अतिशयित वाईट वाटलें; आणि, त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांजबरोबर कांहीं लष्करी लोक देऊन, त्यानें त्यांस मोठ्या बंदोबस्तानें आपल्या मोठ्या छावणींत पाठवून दिलें.

नंतर जनरल बेर्द टिपूचे प्रेताचा शोध करूं लागला. तें प्रथम त्यास कोठें सांपडेना. परंतु, वेशीजवळ जो प्रेतांचा ढीग पडला होता, त्यामध्यें तें आहे, असें समजल्यावर तो तिकडे गेला. इतक्यांत रात्र पडली; ह्मणून मशाली लाविल्या. बरींच प्रेतें इकडचीं तिकडे टाकिल्यावर, शेवटीं, श्रीरंगपट्टणच्या सुलतानाचें प्रेत सांपडलें. तें बरेंच छिन्नविच्छिन्न झालें होतें. तरी तें त्याच्या लोकांनीं तेव्हांच ओळखिलें. त्या प्रेताचे डोळे ताठ उघडे होते; आणि त्याचें शरीर इतकें ऊन लागत होतें कीं, तो जीवंत आहे कीं काय, असा जनरल बेर्द ह्यास संशय आला. तेव्हां त्यानें त्याची नाडी पाहिली. तेथें कांहीं एक हालचाल नव्हती, ह्यावरून तो मरण पावला, असें खास ठरलें. त्याला चार जखमा झाल्या होत्या; तीन शरीरावर, आणि एक डोक्यावर. त्या गर्दीमध्यें त्याचें पागोटें, आंगरखा, तरवार, इत्यादि सर्व वस्तु अस्ताव्यस्त होऊन इकडे तिकडे पडल्या होत्या. परंतु, कांहीं एक मंत्रानें भारलेली जादूची पेटी त्याच्या उजव्या दंडास बांधलेली असे, ती तशीच होती. त्या

पेटीवर कांहीं आरबी अक्षरें होतीं. त्याचें प्रेत, तेथील वहिवाटीप्रमाणें, मोठ्या डामडौलानें नेऊन पुरिलें.

ह्याप्रकारें श्रीरंगपट्टण हातीं आल्यावर, तत्संबंधीं, हल्ल्याच्या आरंभापासून तों त्याचें काम आटोपेपर्यंत, सगळ्या गोष्टींचा गोष्वारा काढिला. त्यावरून असें समजलें कीं, हल्ल्याचें काम तारीख ४ एप्रिल रोजीं सुरू होऊन, बरोबर एका महिन्यानें, तारीख ४ मे रोजीं संपलें. ह्या कृत्यांत इंग्लिश सरकारचे एकंदर ११६४ लोक पडले, आणि टिपूकडचे आठ हजारांहून अधिक मरण पावले; तीनचारशें तोफा, पांचचार हजार बंदुका, ४२४००० तोफांचे गोळे, ५२०००० पौंद दारू, आणि जवाहीर वगैरे सर्व मिळून ११४३२१६० रुपयांचा खजीना, इतकें इंग्लिश सरकारच्या हातीं लागलें.

श्रीरंगपट्टण काबीज करण्याचे कामीं मुख्यत्वेंकरून जनरल बेर्द ह्यास पराकाष्ठेचे श्रम पडले होते, ह्याकरितां, तेथच्या कारभाराचें सर्व सूत्र त्याचे हातीं देणें हें योग्य होतें. परंतु, तसें झालें नाहीं. मध्यें एक दोन भानगडी होऊन, शेवटीं, तेथचे सर्व लष्करी आणि मुलकी अधिकार कर्नल आर्थर वेल्सली ह्यास मिळाले. बीव्हरिड्ज हा ग्रंथकार असें ह्मणतो कीं, "एवढे मोठे दोन अधिकार कर्नल आर्थर वेल्सली ह्यास देण्यासारखीं त्याचे हातून पराक्रमाचीं किंवा शाहाणपणाचीं कामें घडलीं नव्हतीं; तर त्याचा भाऊ गव्हरनर जनरल होता, ह्मणूनच त्याची योग्यता इतकी वाढली; दुसरें कांहीं नाहीं." हें खरें आहे. ह्या प्रसंगीं दुसरा जर कोणी गव्हरनर जनरल असता, तर हें एवढें काम कर्नल आर्थर वेल्सली ह्यास खचीत मिळालें नसतें. चवथे तारखेस श्रीरंगपट्टण हातीं आलें; पांचवे तारखेस कर्नल आर्थर वेल्स-

ली ह्यास सर्व अधिकार सरकारानें दिले; आणि ६ व्या तारखेस त्याविषयीं जनरल बेर्द ह्यानें कमांदर इनचीफ ह्यास पत्र लिहिलें. त्यांत त्यानें असें लिहिलें आहे कीं, "माझें कोणतें काम सरकाराच्या मर्जीबाहेर झालें, आणि माझा असा अपमान करण्यास त्यास काय योग्य कारण दिसलें हें मला खरोखर समजत नाहीं." श्रम एकानें करावे, आणि त्याचें फळ दुसऱ्यानें घ्यावें, हें अगदीं वाजवी नाहीं. आणि असें झालें ह्मणजे मनुष्याला संताप आल्यावांचून राहात नाहीं. परंतु, स्वहितबुद्धीपुढें इतर विचाराचें कांहीं चालत नाहीं; आणि त्यामुळें अशा गोष्टी वारंवार घडतात.

श्रीरंगपट्टणचा सगळा मुलकी आणि लष्करी अधिकार सरकारानें कर्नल आर्थर वेल्सली ह्यास दिल्यामुळें, तेथील राज्यक्रांतीमुळें झालेली गडबड मोडणें आणि जिकडे तिकडे स्वस्थता करणें हें मोठ्या महत्वाचें काम त्या एकट्यावर पडलें. हें काम खरोखर फार कठीण होतें. कारण, त्या वेळीं त्या प्रांतामध्यें सगळी झोटिंगबादशाही माजली होती. तिची सगळी हकीकत कोठें लिहिलेली अढळत नाहीं. परंतु, त्या वेळीं कर्नल आर्थर वेल्सली ह्यानें जनरल हारिस ह्यास जीं पत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून त्या स्थितीचें थोडें बहुत अनुमान करितां येतें. मेच्या ५ व्या तारखेस सकाळच्या दाहा वाजतां जें पत्र लिहिलें आहे, त्यांत असें आहे कीं, "येथें सगळा गोंधळ आहे. आपण उद्यां सकाळपर्यंत, किंवा निदान आज सायंकाळपर्यंत तरी येथें शहरामध्ये येऊंनये. . . . गोरे शिपायांच्या दोन आणि काळ्यांच्या तीन, अशा पांच पलटणी लवकर पाठवून देऊन येथले शिपायी लोक लवकर परत बोलावून नेले, तर फार बरें होईल. . . . येथें कांहीं जबर-

दस्त वाघ आहेत. त्यांस मीरअलम जवळ बोलावून आणून संभाळील तर बरें होईल. तसें न झालें, तर त्यांस गोळ्या घालून मारून टाकणें भाग पडेल. कारण आतां त्यांस कांहीं खायास नाहींसें झालें आहे, त्यांस संभाळावयास कोणी नाहीं, आणि ते दिवसेंदिवस अधिकाधिक उपद्रव-कारक होत चालले आहेत." त्याच तारखेच्या दिवसाच्या दोन वाजतांच्या पत्रांत असें आहे कीं, "एक चांगला फौज-दार सत्वर पाठवून द्यावा, आणि त्यास माझे हुकुमाप्रमाणें वागण्यास हुकूम करावा. लुटणाऱ्या दांडग्या लोकांतल्या कांहीं लोकांस एकदम फांशीं दिल्याखेरीज येथील लुटालूट बंद व्हावयाची नाहीं. . . . खजीन्याचें काय करावें, ह्याविषयीं जर आपणांकडून लवकर लिहून येईल, तर मी आपला फार आभारी होईन." त्या दिवसाच्या संध्याकाळच्या पत्रांत असें आहे:—"पहिल्यापेक्षां आतां कांहीं बरें आहे; तरी, दांडगा-वा समूळ नाहींसा झाला नाहीं. फौजदारानें पांच चार आसामी फांसांत अडकविल्याशिवाय स्वस्थता आणि सुरक्षितपणा हीं प्राप्त व्हावयाचीं नाहींत. ह्या वेळीं आपल्या लष्करांतल्या सगळ्या पलटणींतले थोडेथोडे लोक शहरामध्यें आहेत. अशा प्रसंगीं वारंवार हजीरी घेणें आणि परवानगीवांचून छावणीबाहेर न जाण्याविषयीं शिपायांस सक्त ताकीद देणें हें फार आवश्यक आहे. पलटणींतले अमंलदार लोक शहर पाहण्याकरितां वारंवार शहरांत येऊन इकडे तिकडे हिंडत असतात, हेंही तूर्त बंद करावें, असें वाटतें. कारण त्यांस पाहून शहरांतले लोक घाबरून जाऊन उगाच घोंटाळा करितात. भय आणि घोंटाळा हीं नाहींतशीं होत तोंपर्यंत लोक स्वस्थ व्हावयाचे नाहींत." आणखी साहाव्या तारखेच्या

पत्रांत असें आहे कीं, "आतां लुटालूट बंद झाली आहे; शहरांतली सगळी आग विझवून टाकिली आहे. आणि लोक आपापल्या घरांत स्वस्थपणें राहूं लागले आहेत. मी सध्यां प्रेतें पुरण्याचे कामांत गुंतलों आहें. हें काम बहुत-करून आज पुरें होईल. शहराच्या बंदोबस्ताकरितां एक अमलदार कायमचा नेमावा, आणि त्याचे हाताखालीं चांगले बरेच लोक द्यावे, हें मला आवश्यक वाटतें. बंदोबस्ताची व्यवस्था वारंवार बदलूं नये, अशी तजवीज ठेविली पाहिजे." तेंही काम जनरल हारिस ह्यानें कर्नल वेल्सली ह्यावरच सोंपिलें. आणि त्यानें लागलीच शहरांत उत्तम स्वस्थता केली.

ह्या नेमणुकीविषयीं कितीएक लोकांनीं पुष्कळ बोभाट केला, आणि तिची हाकाहाक सरकारापर्यंत नेली. स्वतः जनरल हारिस ह्यानें ह्याविषयीं लार्ड मार्निंगतन ह्यास एकदां असें लिहिलें कीं, "हेवेखोर लोक ह्या नेमणुकीविषयीं नाना-प्रकारच्या मूर्खपणाच्या गप्पा मारीत आहेत, असें मी एकतों. परंतु, त्यांजकडे तिळमात्रही लक्ष न देतां मी आपणास कळवितों कीं, ही जी नेमणूक आह्मीं केली आहे, ती, कोण-त्याही पर्यायानें पाहिली तरी, अगदीं यथार्थ आहे, असें मी सिद्ध करून देईन." सारांश, कर्नल वेल्सली ह्याला जें मोठें काम एकदम मिळालें, तें त्यानें आपणा स्वतःस आणि आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांस भूषण येण्यासारख्या उत्तम रीतीनें बजा-विलें. चोहींकडे उत्तम बंदोबस्त झाला, तेव्हां लोक व्यापार उदीम पूर्ववत् करूं लागले. देशामध्यें चांगले निवडक काम-दार नेमून, प्रजेच्या तंट्याबखेड्यांचा न्याय चांगल्या रीतीनें आणि जलद व्हावा, अशी योजना केली. रस्ते दुरुस्त केले; नद्यांचे बांध बांधिले; आणि जुन्या पाटबंधाऱ्यांचीं

डागडुजी केली; तेणेंकरून रयतेस पुष्कळ सुख झालें; आणि ती कर्नल वेल्सली ह्यास दुवा देऊं लागली. टिपूकडून घेतलेल्या मुलुखाची व्यवस्था लावण्याकरितां चार पांच गृहस्थांची जी एक मंडळी नेमिली होती, तीमध्येंही कर्नल वेल्सली हा होता. ह्मणजे सांगावयाचें मिळून एवढेंच कीं त्या वेळीं ह्मैसूरसंबंधी ज्या कांहीं महत्वाच्या गोष्टी होत असत त्यांमध्यें कर्नल वेल्सली ह्याचें मत घेत असत.

ह्मैसुरांतली सगळी गडबड मोडून लोकांचा उदीम व्यापार सुरक्षितपणें चालला, आणि कर्नल आर्थर वेल्सली देशाची सुधारणा करण्याच्या कामास लागला. इतक्यांत नवें एक विघ्न उत्पन्न झालें. त्याचा प्रकार असा:—पूर्वी धोंड्या वाघ ह्या नांवाचा कोणी एक उद्योगी, साहसी आणि महत्वाकांक्षी पुरुष सावनूरच्या नवाबाच्या चाकरीस राहिला होता. त्याच्या हाताखालीं बरेच लोक असत. त्यानें टिपूच्या राज्यामध्यें शिरून धुमाळी मांडिली. तेव्हां टिपूच्या सरदारांनीं त्याला पकडून आणून जबरीनें मुसलमान केलें, आणि श्रीरंगपट्टणच्या तुरुंगामध्यें मोठ्या बंदोबस्तानें ठेविलें. पुढें कांहीं दिवसांनीं, त्या उद्योगी मनुष्यानें टिपूची मर्जी संपादिली, आणि त्याच्या सैन्यांत नायकीची जागा मिळविली. त्या कामावर असतांही त्यानें कांहीं गुण उधळिले, आणि त्याच्या वर्तणुकेविषयीं फार संशय उत्पन्न झाला; ह्मणून त्याला पुनः कारागृहांत कोंडून ठेविलें. तेव्हांपासून, श्रीरंगपट्टण इंग्लिश सरदारांचे हातीं लागे पर्यंत, तो तसाच तेथें होता. परंतु, टिपूचें राज्य घेतल्यावर, इंग्लिश सरदारांनीं श्रीरंगपट्टणांतले जे अनेक कैदी सोडून दिले, त्यांमध्यें हा धोंड्याही सुटून गेला. तो जो तेथून निघाला,

तो नीट बेदनूर प्रांतांत गेला, आणि त्यानें कांहीं लोक जमवून देशामध्यें लुटालूट मांडिली. टिपूचें राज्य गेल्यामुळें त्याचे लष्करचे जे लोक बेकार होऊन घरीं बसले होते, ते ह्यास जाऊन मिळाले. तेणेंकरून त्याला अधिकच उत्तेजन आलें. त्याच्या धुमाळीचें वर्तमान कानीं पडतांच, कर्नल दालरिंपल आणि कर्नल स्तीव्हनसन हे दोन सरदार त्याजवर गेले. त्यांनीं त्यास शिकारपुरापाशीं गांठिलें, आणि त्याच्या सैन्याचा विध्वंस करून टाकिला. तेव्हां तो तेथून पळून जाऊन मराठ्यांच्या मुलुखांत शिरला. तेथेंही त्याचा पाठलाग इंग्लिश सरदारांनीं केला असता; परंतु, मराठ्यांच्या राज्यांत त्यांच्या परवानगीवांचून स्वारी करणें, हें स्तीव्हनसन ह्यास नीट दिसलें नाहीं. ह्मणून त्यानें आपलें सैन्य आपल्या सरहद्दीवरच थांबविलें, आणि बेदनूर प्रांतांतल्या लोकांस धोंड्या वाघाचें जें मोठें भय पडलें होतें, त्याचें निवारण केलें.

धोंड्या वाघ आपल्या राज्यामध्यें आला असें समजतांच पेशव्यांनीं धोंडोपंत गोखला हा सरदार पुष्कळ सैन्य बरोबर देऊन त्याजवर पाठविला. त्यानें त्याचा अगदीं पराभव करून टाकून, त्याचे घोडे आणि हत्ती त्याजपासून छिनावून घेतले. तेव्हां तो वाघ लागलाच कोलापूरच्या राजाच्या चाकरीस राहिला. आणि त्या वेळीं त्याचें आणि पेशव्यांचें वैमनस्य येऊन युद्ध चाललें होतें. त्यामुळें धोंड्यास आश्रय मिळविण्यास अगदीं देखील आयास पडले नाहींत. तो तेथें कांहीं दिवस राहिला. परंतु, अशा उलाढाली मनुष्यास पारतंत्र्य कोठून आवडणार? तो लवकरच तेथून निघाला, आणि पुनः पहिल्या प्रमाणें ५००० लोक गोळा करून ह्मसू-

रच्या सरहद्दीवर दांडगावा करूं लागला. त्याजवर स्वारी करून त्यास धरावें, आणि एकदम फांशीं द्यावें असा मद्रास सरकारानें कर्नल वेल्सली ह्यास हुकूम दिला. त्याप्रमाणें तो आपलें सैन्य घेऊन निघाला. शिवाय, निजाम आणि पेशवे ह्यांचींही सैन्यें धोंड्या वाघाच्या पारिपत्यास सिद्ध झालीं. पेशव्यांकडच्या सैन्याचा मुख्य सरदार धोंडोपंत गोखलाच होता. त्याचेविषयीं धोंड्या वाघाच्या मनांत इतकें वैर बाणलें होतें कीं, "धोंडोपंत गोखल्याच्या काळजाचें रक्त हातांनीं घेऊन मी आपल्या मिशांस लावीन, नाहीं तर मरून जाईन," अशी त्यानें शपथ वाहिली होती. एके वेळीं धोंडोपंत गोखला आपल्या सैन्यास किंचित् मागें टाकून एकटाच पुढें जात असतां, ह्या वाघानें एका एकीं त्याच्या आंगावर उडी घालून कट्यारीनें त्याचें पोट फाडिलें, आणि त्याच्या काळजाचें रक्त आपल्या मिशांस लावून आपली प्रतिज्ञा शेवटास नेली.

ह्या वेळेच्या सुमारास कर्नल वेल्सली ह्यास, लार्ड मार्निंग्तन ह्यानें, जावा बेटावर बटेव्हिआ ह्मणून दच लोकांचें जें ठाणें होतें, त्यावर हल्ला करण्याच्या कामावर मुख्य सेनापति नेमिलें. ही जागा खरोखर मोठ्या मानाची आणि मोठ्या मिळकतीची होती. आणि ह्मणूनच ती गव्हरनर जनरलानें बुद्ध्या आपले भावास दिली होती. परंतु, कर्नल वेल्सली ह्यानें ती पतकरिली नाहीं. आणि न पतकरण्याचें कारण एवढेंच कीं, ज्या त्रासदायक धोंड्या वाघाचें पारिपत्य करण्याचें काम आपण हातीं घेतलें आहे, तें तसेंच अर्धवट टाकून, केवळ आपल्या हिताकरितां बढतीच्या जागेवर जाणें हें थोर मनाच्या पुरुषास कधीं शोभावयाचें नाहीं, असें त्याला वाटलें.

खरोखर, कर्नल वेल्सली ह्याची ही थोरपणाची गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

धोंड्या वाघ ह्याचें पारिपत्य करण्यास इंग्लिश, निजाम आणि पेशवे ह्यांचीं सैन्यें मोठ्या तयारीनें चोहींकडे फिरत होतीं. तरी तो चपळ पुरुष ताकासतूर लागूं देत नसे. परंतु ह्या वेळीं एक फार चांगली सवड झाली होती. ती ही कीं, त्याचा पाठलाग करण्यास पेशवे आणि निजाम ह्यांचे मुलुखांत जाण्यास इंग्लिश सरदारांस परवानगी मिळाली होती. धोंड्या वाघ इंग्लिशांच्या मुलुखाच्या सरहद्दींतून पार निघून जाऊन, मलप्रभा नदीच्या उत्तरेकडील किनाऱ्यावर निर्भयपणें इकडे तिकडे हिंडत होता. त्याचा माग काढून, कर्नल आर्थर वेल्सली ह्यानें, इ० स० १८०० च्या जुलै महिन्याच्या ३१ व्या तारखेस, त्याजवर छापा घातला, आणि त्याच्या लोकांची दाणादाण करून टाकिली. तो तेथून जो झुकांडी देऊन निघाला, तो महिना दीडमहिना पर्यंत कर्नल वेल्सली ह्यास सांपडला नाहीं. शेवटीं, सप्तंबर महिन्याच्या १० व्या तारखेस, कानघल ह्या खेड्याजवळ त्यानें त्याजवर पुनः हल्ला केला. त्या प्रसंगीं धोंड्या वाघ प्राणास मुकला, आणि त्याच्या हाताखालच्या सर्व लोकांची दुर्दशा झाली. त्या प्रसंगाचें वर्णन कर्नल वेल्सली ह्यानें स्वतः एके ठिकाणीं केलें आहे. त्याचें तात्पर्य असें:—"आह्मीं जेव्हां धोंड्यावर हल्ला केला, तेव्हां त्याजपाशीं ५००० स्वार होते. आह्मी चिनूरास आहों, आणि रात्रीच्यारात्रीं इतके जवळ थडकणार नाहीं, असें तो समजला होता. त्याचा जाण्याचा रोख पश्चिमेकडे होता. त्याचा आशय असा होता कीं, निजाम आणि पेशवे ह्यांचीं जीं सैन्यें तिकडे होतीं, त्यांची

गांठ पडूं देऊं नये. आह्मी जवळ जवळ येत आहों असें दृष्टीस पडतांच, तो आपल्या सर्व लोकांसहवर्तमान एका चांगल्या बंदोबस्ताच्या ठिकाणीं जाऊन बसला. तो आपणास 'भूपति' ह्मणवीत असे, आणि आपल्या सैन्यास 'निरंतर विजयी' ह्मणत असे. तो 'भूपति' आणि तें 'निरंतर विजयी' सैन्य, हीं आमच्या लष्कराशीं सामना करण्याकरितां कांहीं वेळपर्यंत मोठ्या धैर्यानें उभीं राहिलीं. आह्मीं त्यांजवर हल्ला करितांक्षणींच ते सर्व लोक भयभीत होऊन दशदिशा पळून गेले. नंतर आह्मीं त्यांच्या छावणीवर छापा घातला. तेव्हां तेथें पुष्कळ हत्ती, उंटें, आणि इतर सामान हीं आमच्या हातीं लागलीं. पेशवे आणि निजाम ह्यांचीं सैन्यें धोंड्या वाघाच्या टोळ्यांच्या पाठलागामध्यें गुंतलीं होतीं, तीं नुकतींच परत आलीं आहेत. लढाईचें काम आटोपलें आहे. आतां एक दोन दिवसांत आह्मी आपल्या ताब्यांतल्या मुलुखाकडे निघून जाणार आहों." खरोखर, धोंड्या वाघाचें बंड मोडलें, हें कर्नल वेल्सली ह्यानें फार मोठें काम केलें. एके वेळीं सर थामस मनरो हा सरदार ह्याविषयीं बोलत असतां कर्नल वेल्सली ह्यास असें ह्मणाला कीं, "त्या प्रसंगीं तुह्मी आपलें सैन्य घेऊन जर भलतीकडेसच गेलां असतां, तर धोंड्या वाघ खचीत मोठा प्रबल राजा झाला असता, आणि त्याच्या कुळामध्यें क्रूर आणि घातकी राजे उत्पन्न होऊन त्यांनीं प्रजेस पीडा दिली असती."

धोंड्या वाघ आपल्या कितीएक अनुयायांसहवर्तमान रणांगणीं पतन पावल्यावर, त्याचे पुष्कळ लोक कर्नल वेल्सली ह्याच्या हातीं लागले. त्यांमध्यें धोंड्या वाघाचा मुलगा

होता. तो तेव्हां केवळ नऊ दाहा वर्षांचा असून, निराश्रित झाल्यामुळें अगदीं दीन दिसत होता. त्याजकडे पाहून कर्नल वेल्सली ह्यास त्याची फार दया आली, आणि लागलेंच त्यानें त्यास आपणाबरोबर आपल्या तंबूमध्यें नेऊन, त्याच्या खाण्यापिण्याची आणि वस्त्रप्रावर्णाची चांगली व्यवस्था केली. तो मुलगा त्याजपाशीं कितीएक वर्षें होता. पुढें कर्नल वेल्सली जेव्हां स्वदेशीं निघून गेला, तेव्हां त्यानें त्या मुलाच्या संरक्षणाकरितां आपले पदरचा बराच पैसा ह्या देशामध्यें कोणा मित्राजवळ ठेविला होता, असें एके ठिकाणीं लिहिलें आहे. शत्रूच्या मुलाच्या संगोपनार्थ पदरचा पैसा खरचिणें हें खरोखर मोठ्या औदार्याचें आणि थोरपणाचें लक्षण होय.

ह्या प्रकारेंकरून धोंड्या वाघाचें प्रकरण आटोपलें, इतक्यांत फ्रान्स देशाचा नवा सरदार नापोलियन बोनापार्त ईजिप्त देशांत येऊन आपला अंमल चोहींकडे अधिकाधिक बसवूं लागला; आणि त्याच्या संसर्गानें, हिंदुस्थानांतल्या राजांच्या लष्करांमध्यें जे फ्रेंच लोक होते, ते गुप्तपणें विशेष तयारीनें राहूं लागले, असें दिसून आलें. तेव्हां ईजिप्त देशांत सैन्य पाठविण्याची योजना झाली. ह्या मोहिमीबरोबर कर्नल वेल्सली ह्यानें जावें, असें प्रथम ठरलें होतें. त्याविषयींची हकीकत सांगण्यापूर्वीं, नापोलियन बोनापार्त हा अगदीं साधारण प्रतीचा मनुष्य असून राजपद कसा पावला, त्याचें वर्णन करणें आवश्यक दिसतें. ह्यास्तव त्याची संपूर्ण उदयकथा ह्याच्या पुढच्या भागांत आधीं सांगावी, आणि नंतर पुनः प्रकृत विषयाकडे वळून ह्या दोघां विलक्षण शूर पुरुषांनीं जीं मोठमोठालीं जगविख्यात कृत्यें केलीं, त्यांचें ससंगत विवेचन करावें, असें योजिलें आहे.

# भाग दुसरा.

भूमध्य समुद्रामध्यें कोर्सिका ह्मणून एक बेट आहे. त्यांतील अजाक्को नामक गांवामध्यें नापोलियन बोनापार्त हा इ० स० १७६९ च्या आगस्त महिन्याच्या १५ व्या तारखेस जन्मला. त्याच्या बापाचें नांव चार्लस आणि आईचें नांव लेतिशिया रामोलिनी असें होतें. चार्लस हा वकीलीचा धंदा करून घरचा खाऊन पिऊन बरा होता. कोर्सिका बेटांतील लोक, आपल्या पौली ह्या नामांकित सरदाराच्या हाताखालीं एकत्र होऊन फ्रेंच लोकांशीं लढत असतां, चार्लस हा आपल्या देशाच्या यशरक्षणार्थ कायावाचामनें करून झटत होता. तेव्हां त्याला नानाप्रकारचीं संकटें भोगावीं लागलीं. त्या सर्वांमध्यें त्याची पत्नी लेतिशिया रामोलिनी ही निरंतर त्याजबरोबर राहून त्याच्या क्लेशांस वांटेकरीण होई. ती बायको अगदीं तरुण, अत्यंत सुस्वरूप, मोठी धैर्यशाली, आणि पतीस साह्य करण्याविषयीं तत्पर अशी असल्यामुळें, चार्लसास जरी कितीही कष्ट झाले, तरी, किंचित् विश्रांति मिळाल्याबरोबर, तिच्या, परम मनोरम सहवासानें त्याचा सगळा शीण हरे, आणि पुनः उद्योग करण्याविषयीं त्यास नवी उमेद येई. ह्या तिच्या गुणाविषयीं लोकांमध्यें तिची मोठी आख्या असे. नापोलियनाच्या खेपेस तिचे दिवस अगदीं भरले होते, तेव्हां देखील तिनें आपल्या नवऱ्यास साह्य करण्याचें काम सोडिलें नाहीं; तें इतकें कीं, ती त्याजपासून बाहेरून घरीं आली, आणि लागलीच प्रसूत झाली. हा तिचा दुसरा मुलगा होता. पहिल्या मुलाचें नांव योसेफ असें होतें. तोच पुढें स्पेनचा राजा झाला.

त्याला आणखी तीन लहान भाऊ होते; त्यांचीं नांवें ल्युशियन, लुईस आणि जेरोम अशीं होतीं. आणखी, इलैझा, कारोलैन, आणि पालैन अशा तीन बहिणी होत्या.

कोर्सिका येथील लोकांची आणि फ्रेंच लोकांची जी झटापट चालली होती असें वर वर्णिलें आहे, ती आटोपून शांतता झाल्यावर, कोर्सिका येथील फ्रेंच गव्हरनराच्या मेहेरबानीनें चार्लस ह्यास तेथील सरकारी वकीलाची जागा मिळाली. ती जागा बऱ्याच योग्यतेची आणि पुष्कळ प्राप्तीची होती. लेतिशिया रामोलिनी हिचें फ्रेंच गव्हरनर मारब्यूफ ह्याशीं दुराचरणाचें एकान्त सख्य होतें, आणि तिच्या संधानानें ही जागा चार्लसास प्राप्त झाली, असें कितीएक दोषदृष्टि ग्रंथकारांचें ह्मणणें आहे; परंतु त्यास कांहीं चांगलासा आधार नाहीं.

नापोलियनाच्या बालपणची हकीकत कोठें फारशी आढळत नाहीं. त्याला आईचा फार लळा असे. तो बहुतकरून नेहमीं तिजजवळ राही. ती त्याला जीवकाप्राण करी, आणि त्याचीही तिजवर फार भक्ति असे. ही गोष्ट केवळ लहानपणचीच नव्हे. तर, तो प्रौढ झाल्यावरही आपल्या आईचे फार फार उपकार मानी, तो वारंवार असें ह्मणून दाखवी कीं, "मोठेपणामध्यें मला जी कांहीं योग्यता प्राप्त झाली, ती, माझ्या मातुश्रीनें बालपणांत ज्या उत्तम गोष्टी माझ्या मनांत बिंबवून दिल्या होत्या, त्यांच्या योगानें झाली. प्रौढ वयामध्यें मनुष्य बरें किंवा वाईट निपजणें, हें सगळें त्याच्या मातुश्रीच्या वृत्तीवर आहे." ही गोष्ट ज्या देशांमध्यें स्त्रीशिक्षणाचा प्रचार उत्तमावस्थेस पोहोंचला आहे त्या देशांतील लोकांच्या संबंधानें खरी आहे.

लहानपणीं नापोलियन फार खेळाडू होता; तरी तो मुलांत फारसा मिसळत नसे. सुटीच्या दिवशीं घरीं एकटाच खेळत बसे. त्याच्या खेळाची आवडती वस्तु ह्मटली ह्मणजे एक लहानशी पितळेची तोफ होती. त्याचें एकांतीं बसावयाचें ठिकाण, घरापासून सुमारें अर्ध्या कोसावर, समुद्रकांठीं होतें. तें आतां मोडून गेलें आहे, तरी त्या जागेला अद्यापि 'नापोलियनाचें खोपट' असें ह्मणतात. तो मोठा भांडखोर आणि जबरा हट्टी असे. जें मनांत येईल तें एकदम करावें, आणि कोणाचें कधीं कांहीं ऐकूं नये, असा त्याचा स्वभाव होता. त्याच्या आंगावरचे कपडे नेहमीं मळके असत. आणि त्याला मंडळींत मिळून वेळ घालविण्यापेक्षां एकांतीं जाऊन बसणें फार आवडत असे. एके दिवशीं त्यानें एका गृहस्थाच्या बागेंत शिरून तेथले कांहीं अंजीर चोरिले. ते घेऊन तो पळत होता इतक्यांत त्या गृहस्थानें त्यास पकडिलें, आणि हें सगळें वर्तमान आतां मी तुझ्या आईला कळवितों असें त्याला भय घातलें. त्या वेळीं नापोलियन त्या गृहस्थाशीं आपल्या बालभाषेंतच इतकें समर्पक बोलला कीं, त्यावरून तो निरपराधी आहे, असें त्या गृहस्थास वाटून त्यानें त्याला सोडून दिलें.

कॉर्सिका येथील फ्रेंच गव्हरनराच्या कृपेच्या योगानें, चार्लसास, ह्मणजे बोनापार्ताच्या बापास, इ० स० १७७६ मध्यें, फ्रान्सदेशाचा राजा १६ वा लुई ह्याच्या दरबारचें कांहीं एक मोठें काम मिळालें. तेव्हां बोनापार्त सात वर्षांचा होता. ते बापलेक इताली देशांतून प्रवास करीत करीत पारिस येथें येऊन सुखरूप पोहोंचले. तेथें चार्लसानें बोनापार्तास शाळेमध्यें घातलें. त्या ठिकाणीं त्यानें इतालियन

आणि फ्रेंच ह्या दोन भाषांचा अभ्यास फार चांगला करून मोठी शाबासकी मिळविली. तेथें तरी त्याचे खेळ सुटले नव्हते. त्याला सर्व खेळांमध्यें लुटुपुटूच्या लढायांचा खेळ फार आवडत असे. इ० स० १७८२ मध्यें त्याला युद्धविद्या शिकण्याच्या शाळेमध्यें घातलें. तेथेंही अभ्यासाविषयीं त्याची मोठी आख्या झाली. गणित आणि इतिहास हे त्याच्या आवडीचे विषय होते. त्यांत अतिशयित परिश्रम करून तो मोठा पंडित झाला.

इ० स० १७८५ च्या आगस्त महिन्यांत त्याला सत्रावें वर्ष लागतांच, फ्रान्स देशाच्या सरकाराच्या तोफखान्यांत त्याला लहानशी अमलदारीची जागा मिळाली. ज्या तुकडीस जाऊन मिळण्यास त्याला हुकूम झाला होता, ती त्या वेळेस व्हालान्स येथें होती. तेथें जाऊन तो आपल्या जागेवर रुजू झाला. तेथें तो फार मनमिळाऊ झाला, आणि त्यानें आपल्या विद्येनें, उद्योगानें, आणि सभ्य रीतीनें आपल्या संबंधाच्या सर्व लहानमोठ्या लोकांची मर्जी संपादिली. लहानपणीं एकलकोंडा असून इतक्यांत त्याचा स्वभाव इतका पालटला, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ह्याच वर्षी त्याचा बाप मरण पावला. बोनापार्त व्हालान्स येथें असतां, "कोणत्या मतांचें आणि कोणत्या साधनांचें अवलंबन केलें ह्मणजे सर्व लोक फार सुखी होतील," ह्याविषयीं जो कोणी उत्तम निबंध लिहील, त्यास अमूक मोठें बक्षीस मिळेल, अशी लयान्स येथील विद्वान् मंडळीनें एक जाहिरात लाविली. तें बक्षीस नापोलियन बोनापार्तानें मिळविलें. पुढें, त्यास राजपद प्राप्त झाल्यावर तो लेख कोणी एकानें मिळवून, त्यास संतुष्ट करण्याकरितां त्याजपुढें आणून ठेविला. तो

त्यानें प्रथम हातांत घेऊन पाहिला; परंतु, लागलाच जवळच्या आगटींत टाकून तो त्यानें जाळून टाकिला! त्यांत सांगितलेल्या बोधाच्या विपरीत आपलें आचरण आहे, असें मनांत येऊन लाज वाटून त्यानें असें केलें असावें, असें एका ग्रंथकाराचें अनुमान आहे, तें खरें दिसतें. लहानपणचे विचार मोठेपणीं आवडत नाहींत हें एक, आणि जसा उपदेश करावा तसें वागतां येत नाहीं, हें दुसरें, अशीं दोन तात्पर्यें ह्या गोष्टीपासून निघतात.

नापोलियन बोनापार्ताचा विद्याभ्यास कोठें कसा झाला, आणि तो तोफखान्यामध्यें चाकरीस कधीं राहिला, ह्या गोष्टीचें वर्णन पूर्वीं केलेंच आहे. आतां तो असा साधारण शिपायी असतां, थोडक्या काळामध्यें भराभर वाढत जाऊन राजपद कसा पावला, हें चांगलें स्पष्ट करून सांगण्यास त्यावेळची फ्रान्स देशाची स्थिति कशी होती हें आधीं सांगणें आवश्यक दिसतें. त्या वेळीं फ्रान्स देशाच्या गादीवर सोळावा लुई हा राजा होता. तो स्वभावानें फार चांगला, धर्मशील, नीतिमान्, आणि आपल्या प्रजेचें हित साधण्याविषयीं परमदक्ष, असा होता. परंतु, थोड्या वर्षांपूर्वीं इंग्लंद आणि अमेरिका ह्या दोन प्रदेशांतील इंग्लिश लोकांची लढाई चालली असतां, इंग्लंदाविषयीं द्वेष मनांत धरून, फ्रान्सच्या बादशाहानें अमेरिकेंतल्या लोकांस साह्य दिलें. त्या कामीं पुष्कळ पैसा उडाला. खजीन्यांत द्रव्य नाहींसें झालें. राज्याचीं कामें चालण्यास अडचण पडूं लागली. राज्यास कर्ज अतिशयित झालें. तेणेंकरून लोकांवर नवनवे कर बसण्याचा प्रसंग प्राप्त झाला. त्या करांच्या ओझ्याखालीं प्रजा अगदीं वांकून गेली. राजा

इच्छेस येईल तसे खर्च करितो, ह्यामुळें आपणांस नाना प्रकारचे भारीभारी कर द्यावे लागतात, असें कांहीं लोकांच्या मनांत आलें. त्यांच्या मंडळीस कांहीं डोईजड माणसें मिळालीं. अशा प्रकारीं पारिस येथील व आसपासच्या प्रदेशांतील लोकांत दुफळी झाली. बादशाहाच्या पार्लमेंतांतले देखील कितीएक लोक त्याजवर उठले. हा राजा नको, असें लोक उघड बोलतां बोलतां, वेड्यासारखे पिसाळून हातघाईस आले. शेवटीं, बादशाहाचा द्वेष करणाऱ्या लोकांचें प्राबल्य फार वाढून, त्यानीं, विश्वासघाताच्या आरोपावरून, सोळाव्या लुईस, तारीख २१ जानेवारी सन १७९३ इ० रोजीं ठार मारिलें. तरी देशांतली गडबड मोडली नाहीं. एकसारखा गोंधळ चालला होता. ह्या झोटिंगबादशाहीच्या वेळीं राजपक्षाकडच्या आणि लोकपक्षाकडच्या सैन्यांच्या ज्या लढाया झाल्या, त्यांमध्यें नापोलियन बोनापार्तांचें शौर्य आणि शाहाणपण हीं लोकांस दिसून येऊन, त्याची सर्वांवर छाप बसली. आणि तो कोणी विजातीय योद्धा आहे, असें लोक मानूं लागले. बाहेरच्या प्रदेशांत राजपक्षाच्या लोकांचा पराभव करून, त्यानें पारिस शहरांतली गडबड मोडून टाकिली, आणि लोकांचे सर्व व्यवहार निर्भयपणें चालत अशी तजविज ठेविली, तेव्हां तर त्याची फारच वाहवा झाली. नंतर त्यास बरोबर पुष्कळ सैन्य देऊन पारिसच्या मुख्य सभेनें इताली देशांत पाठविलें. त्या देशांतलीं पुष्कळ संस्थानें त्यानें घेतलीं, आणि त्याचा जिकडे तिकडे जय होत चालला, तेव्हां आस्त्रिआच्या राजानें त्याशीं तह केला. पुढें इ० स० १७९८ च्या मे महिन्यांत त्यानें ४०००० आरमारासहवर्तमान ईजिप्त देशावर

स्वारी केली. वाटेनें जात असतां त्यानें मालता हें मजबूत बेट घेतलें. त्यास पूर्वीप्रमाणें ईजिप्त देशांतही जय प्राप्त झाला. आणि त्याविषयीं त्यानें कायरो येथें मोठा उत्सव केला. तो तसाच देश काबीज करीत पुढें गेला असता, परंतु सर सिदनी स्मिथ ह्या इंग्लिश सरदारानें आपल्या बरोबरच्या थोड्याशा सैन्याकरवीं त्यास किंचित् मागें हटायास लाविलें, आणखी कितीएक ठिकाणीं त्याच्या सैन्याच्या टोळ्यांस अशाच कांहीं अडचणी प्राप्त झाल्या, आणि पारिस शहरामध्यें पुनः बेबंदी होऊन 'नापोलियन बोनापार्त पाहिजे', असें सर्व लोक ह्मणूं लागल्याचें वर्तमान त्यास समजलें ; ह्मणून तो लागलाच गुप्तपणें पारिस शहरांत प्राप्त झाला. तेथें जे लोक गडबड करीत होते, त्यांजवर आपल्या तोफा सोडून, त्यानें चोहींकडे पूर्ववत् शांतता केली. नंतर, सर्वांनुमतें त्याला, 'फर्स्त कांनसल' असा किताब मिळाला, आणि तो जें करील तें प्रमाण असें झालें. इतालीमध्यें मागच्या स्वारींत त्यास त्याच्या इच्छेप्रमाणें जय मिळाला नव्हता; ह्मणून तो पुनः बरोबर मोठें सैन्य घेऊन तिकडे गेला. त्यास इ० स० १८०० च्या जून महिन्यामध्यें मारेंगो येथें मोठा जय प्राप्त झाला. नंतर, आस्त्रिआप्रमाणें इंग्लंदच्या राजानें ही त्याशीं तह केला. परंतु, त्यांत कांहीं अर्थ नव्हता. अशा प्रकारें नापोलियन बोनापार्तांची योग्यता वाढतां वाढतां सर्वांस एकीकडे ठेवून, तो इ० स० १८०४ च्या मे महिन्यांत आपणास फ्रान्स देशाचा बादशाहा ह्मणवूं लागला; आणि लागलाच दिसेंबर महिन्यांत त्यानें आपणास पोपाकरवी संस्कार पूर्वक राज्याभिषेक करविला. ह्या वेळीं जोसेफाइन ही त्याची बायको होती. ती अत्यंत सुस्वरूप होती. तिच्या

मस्तकीं त्यानें स्वहस्तें मुकुट घातला. नापोलियन बोनापार्त हा प्रकृत पुस्तकाचा प्रधान विषय नव्हे; ह्याजकरितां त्याजविषयीं ह्याहून अधिक सविस्तर लिहिणें योग्य वाटलें नाहीं. तथापि, आरंभीं अगदीं साधारण प्रतीचा सरकारचा नौकर असून, तेव्हांची लोकस्थिति, बुद्धिमान आणि पराक्रमी पुरुषांच्या उदयास जशी अनुकूल असावी तशी असल्या मुळें आणि आपल्या अलौकिक गुणांच्या योगानें तो कसा राजत्व पावला, हें ह्या थोड्याशा वर्णनावरून सहज लक्षांत यावयाजोगें आहे.

नापोलियन बोनापार्त ईजिप्त देशांत आल्याचें वर्तमान हिंदुस्थानाचा गव्हरनर जनरल लार्द मार्निंगतन ह्यास कळतांच, त्यानें त्याशीं सामना करण्याकरितां कांहीं फौज पाठविण्याचा विचार केल्याची हकीकत पहिल्या भागाच्या शेवटीं सांगितली आहे, ती आमच्या वाचकांच्या लक्षांत असेलच. त्या विचाराप्रमाणें हिंदुस्थानांतल्या इंग्लिश सराकारचें ५००० सैन्य सीलोन बेटामध्यें त्रिंकोमाली येथें सज्ज होऊन राहिलें, आणि त्याचें आधिपत्य कर्नेल वेल्सली ह्यास मिळालें. तें सैन्य अमक्याच ठिकाणीं पाठवावयाचें, असा कांहीं एक निश्चय ठरला नव्हता; परंतु, प्रसंगीं जेथें कारण पडेल तेथें तें पाठवावें, अशी लार्द मार्निंगतन ह्याची योजना होती. कर्नेल आर्थर वेल्सली त्रिंकोमाली येथें आपल्या अधिकाराच्या जाग्यावर रुजू झाला, त्या वेळीं फ्रेंच्यांच्या ताब्यांतल्या मारिशस बेटावर एकदम हल्ला करावा हें बरें, असें सर्वांस वाटत होतें; परंतु, असें करणें फार गैर सोईचें आहे, असें त्याचे मनांत येऊन, त्यानें तें आपल्या जवळच्या सर्व लोकांस कारणपूर्वक कळविलें, आणि तो विचार अगदीं रहित केला.

पुढें कशी काय व्यवस्था करावयाची ह्याविषयीं वाटाघाट चालली असतां विलायत सरकाराकडून मद्रासच्या गव्हरनरास असा हुकूम आला कीं, फ्रेंच लोक दिवसानुदिवस अधिकाधिक पुढें पुढें येत चालले आहेत असें दिसतें, ह्याजकरितां त्यांजवर सैन्य पाठविण्यास अगदीं विलंब लावूं नये; आणि ह्या कृत्यास आरंभ करण्यास गव्हरनर जनरलाच्या हुकुमाची वाट पाहूं नये. ह्या हुकुमाची एक नकल मद्रासच्या गव्हनरानें कर्नल वेल्सली ह्याजकडे त्रिंकोमाली येथें पाठवून दिली. तिजवर त्यानें आपला स्वतःचा कांहीं एक अभिप्राय लिहिला नव्हता. ह्मणजे तें सगळें कर्नल वेल्सली ह्याच्या विचारावर सोंपिलें होतें. हा हुकूम हातीं येतांच त्यानें ईजिप्त देशांत फ्रेंचांस गांठण्याचें योजिलें. त्याप्रमाणें सर्व सिद्धता झाली. गव्हरनर जनरल आपला सखा भाऊ आहे, त्याचा अभिप्राय आपणाविषयीं फार चांगला आहे, आणि आपण जें काम आरंभिलें आहे तें सरकाराच्या फार हिताचें आहे, इतक्या गोष्टी मनांत आणून, पुढें गव्हरनर जनरलाच्या आज्ञेची वाट न पाहतां, तो आपल्या सैन्यासहवर्त्तमान गलबतांत बसून तांबड्या समुद्राच्या किनाऱ्याकडे चालला. त्याच्या गलबतांवरच्या लोकांनीं त्यास असें सांगितलें कीं आपलीं गलबतें मुंबई बंदरांत कांहीं वेळ नागरलीं असतां कांहीं सामानसुमान घेण्यास ठीक पडेल, हें एक; आणि, आपल्या मोहिमेविषयीं गव्हरनर जनरलाकडून कांहीं विशेष लिहून आलें आहे कीं काय, हें पाहावें, हें दुसरें; ह्या दोन कारणांवरून त्यानें आपलीं गलबतें मुंबई बंदरांत नांगरविलीं.

हें इकडे इतकें झालें, तरी, आपलें सैन्य अद्याप त्रिंको-

मालीस आहे, आणि स्वारी अझून तेथून तयार होऊन नि-घाली नाहीं, असें समजून, गव्हरनर जनरल लार्ड मार्निंग-तन ह्यानें असा ठराव करून पाठविला कीं, त्या सैन्याचा मुख्य अधिकार जनरल बेर्द ह्यास द्यावा, कर्नल आर्थर वे-ल्सली ह्यास त्याचे हाता खालीं नेमावें, आणि ह्या स्वारीनें पहिली मोहीम *बाताविययावर करावी. आणखी त्या ठरावांत असें होतें कीं, कर्नल वेल्सली ह्यास जनरल बेर्द ह्याच्या हाता खालची जागा जर न आवडेल, तर, त्यानें, पाहिजे असल्यास, परत श्रीरंगपट्टण येथें आपल्या पूर्वींच्या कामावर जावें. हा ठराव मुंबई येथें कर्नल वेल्सली ह्याचे हातीं आला. तो पाहून तो अगदीं उदास झाला, आणि त्यास फार वाईट वाटलें. तो ह्मणाला, "ह्या सैन्याच्या मुख्य अधिकाऱ्याचे जागेवर नेमणूक करण्यापूर्वींच गव्हरनर जनरलानें ह्या गोष्टीचा चांगला विचार करावयाचा होता. श्रीरंगपट्टण-च्या माझ्या चांगल्या मिळकतीच्या जागेवरून मला बुद्ध्या बोलावून आणून, ह्या सैन्याचें स्वामित्व प्रसिद्धपणें मजला देऊन, आतां एकाएकीं, कारण नसतां, माझा अधिकार कमी करणें अथवा मला पूर्वींच्या जागेवर परत जाण्यास सांगणें हें अगदीं बरोबर नाहीं. येणेंकरून सर्व लोकांमध्यें माझी फार अप्रतिष्ठा झाली आहे. असो, झाल्या गोष्टीस उपा-य नाहीं." इतकें दुःख होण्यास दुसरें एक अंतस्थ कारण असें होतें कीं, श्रीरंगपट्टण काबीज केल्यावर, पराक्रम आणि परिश्रम ह्यांच्या संबंधानें तेथल्या मुख्य अधिकारावर जन-रल बेर्द ह्याची नेमणूक व्हावी, हें योग्य असतां, त्याचे हक्क एकीकडे ठेवून त्या जागेवर, लार्ड मार्निंगतन ह्यानें कर्नल

* जावा बेटांतील डच लोकांच्या वसाहतीस हें नांव आहे.

आर्थर वेल्सली ह्याची नेमणूक केली होती, त्यावरून ह्या दोघांचे मनांत एकमेकाविषयीं चुरस होती. मन इतकें उदास झालें होतें, आणि दोघांची एवढी चुरस होती, तरी कर्नल वेल्सली ह्यानें कायद्याप्रमाणें सरकारची आज्ञा मान्य करून मुंबईहून जनरल बेर्द ह्यास असें लिहून पाठविलें कीं आपण हुकूम कराल त्याप्रमाणें मी आपणांस साह्य करण्यास सिद्ध आहें. हें लिहिल्यानंतर लागलेंच त्याला असें समजलें कीं ईजिप्त देशांत लढाईची सुरवात झाली आहे. त्यावरून, जनरल बेर्द आपणास तिकडेसच बोलावील असें अनुमान करून, तांबड्या समुद्राच्या मार्गानें तिकडे जाण्याची त्यानें सर्व सिद्धता केली. इ० स० १८०१ च्या मार्च महिन्याच्या २९ व्या तारखेस निघावयाचें असा त्यानें निश्चय केला. त्याच दिवशीं त्यानें आपला भाऊ हेनरी ह्यास एक पत्र लिहिलें. त्यांत असें होतें कीं, "ह्या ठरावापासून मला किती त्रास झाला आहे, हें मीं लिहिलें पाहिजे असें नाहीं. त्याची कल्पना आपणांस सहज करितां येईल. परंतु, जो पुरुष आपले अभिप्राय, आणि आपल्या सोई एके बाजूस ठेवून स्वदेशकल्याणास झटत नाहीं, त्या पुरुषाची स्वदेशहितबुद्धि आणि त्या पुरुषाचा स्वदेशाभिमान हीं अगदीं व्यर्थ आहेत, असें मी समजतों." हें पत्र पाठविल्यावर कांहीं वेळानें तो गलबतांत बसायास जाणार होता, इतक्यांत एकाएकीं त्याला असा ताप भरला कीं त्यामुळें त्यास तिकडे जाण्याचा विचार रहित करावा लागला. तरी, तांबड्या समुद्रांतून जातांना त्याच्या मनांत मार्गानें कोणत्या कोणत्या गोष्टी कसकशा करावयाच्या होत्या, त्यांविषयींचें एक टिपण त्यानें जनरल बेर्द ह्याजकडे पाठविलें. नंतर तो मुंबईहून

निघून पुनः ह्मैसूर प्रांतांत आपल्या पूर्वींच्या अधिकारावर जाऊन काम पाहूं लागला. ह्या प्रकरणांत स्वदेशहितबुद्धि आणि स्वदेशाभिमान ह्यांविषयीं कर्नेल वेल्सली ह्यानें आपल्या भावास जें लिहिलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

फ्रेंचांशीं लढायास जाण्याचे कामांत कर्नेल वेल्सली ह्याचा जरी बराच हिरमोड झाला होता, तरी हातीं धरिलेलें काम दक्षतेनें आणि मोठ्या उमेदीनें करण्याची जी त्याची स्वाभाविक वृत्ति ती चळली नाहीं. तो मुंबईहून परत ह्मैसूरास गेल्यावर देशसुधारण्याचें आणि लोकप्रीति संपादण्याचें काम तो पहिल्याही पेक्षां अधिक झपाट्यानें करूं लागला. त्याच्या ताब्यांत दिलेल्या प्रांताचें उत्पन्न थोडक्या वेळांत पुष्कळ वाढलें, आणि त्यांतले लोक त्याला फार थोर मानूं लागले, हें पाहून मद्रासच्या गव्हरनरास मोठें नवल वाटलें, आणि कर्नेल वेल्सली ह्याच्या कर्तबगारीची सरकारामध्यें मोठी तारीफ झाली.

ह्याप्रमाणें ह्मैसुरामध्यें कर्नेल आर्थर वेल्सली हा शांततेचीं कामें उत्तम प्रकारें चालवीत असतां, हिंदुस्थानाच्या दुसऱ्या एका भागामध्यें नवें राज्यप्रकरण उद्भवून, त्या संबंधानें युद्ध करण्यास त्याला तिकडे जावें लागलें. त्याचा प्रकार असा :— हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांशीं कलह करण्याचा प्रसंग होईल तितका प्रयत्न करून टाळावा आणि त्यांशीं स्नेहभावानें वागून आपल्या राज्याचा कारभार स्वस्थपणें चालवावा, असा गव्हरनर जनरलाचा फार मनोदय होता. आणि त्याप्रमाणें वागण्यास तो प्रयत्न करीत असे. परंतु, त्याच्या राज्याभोंवतालच्या एतद्देशीय राजांची स्थिति बरी नव्हती. पेशव्यांच्या दरबारांत आंतलेआंत कज्जे

चालले होते. शिंदे, होळकर, आणि वऱ्हाडचे राजे भोंसले हे तिघे, पेशव्यांच्या दरबारीं आपला पगडा पडून त्यांचें सगळें राज्यसूत्र आपले हातीं यावें ह्मणून महाप्रयत्न करीत होते. बाह्यात्कारीं ते इंग्लिश सरकाराशीं बरेच सौम्यतेनें वागत होते; परंतु, फ्रेंचांच्या साह्यानें त्यांची एकदा उचलबांगडी करायास सांपडेल तर बरें होईल, असें त्यांस फार वाटत असे. युरोपांत फ्रेंच आणि इंग्लिश ह्यांचा तह झाला होता, तरी, हिंदुस्थानांतल्या राजे लोकांचीं मनें कशीं चलबिचल झालीं होतीं, हें पूर्णपणें मनांत आणून, त्यांशीं नापोलियन बोनापार्ताच्या गुप्त मसलती चालल्या होत्या. शिंद्याच्या लष्करांतला फ्रेंच सरदार पेरन ह्याचें मान दिवसेंदिवस बळावत चाललें होतें. त्याच्या हाताखालीं शिंद्याची २०००० फौज होती; तिजमधील अमलदार फ्रेंच लोक होते; आणि ते सगळे कवाइतीमध्यें अगदीं निपुण होते. पेरन ह्याचें वजन शिंद्याच्या दरबारामध्यें एवढें होतें कीं, त्यावरून कितीएक मराठ्या सरदारांचें आणि शिंद्याचें वैमनस्य आलें होतें. ह्याचे ठायीं दुप्लीचेसारखें जर राजकारस्थानीपण असतें, अथवा, शेरास सवाशेराप्रमाणें, इंग्लिशांच्या पक्षाकडून जर कर्नल वेलस्ली मिळाला नसता, तर त्या प्रसंगीं हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्यावर खचीत मोठें अरिष्ट ओढवलें असतें. होळकराच्या भयानें बाजीरावपेशवा पुण्यांतून पळून जाण्यापूर्वीं त्याच्या राज्याचें सगळें सूत्र शिंद्याच्या हातीं होतें. असें असतां, त्या पेशव्यास पुनः गादीवर बसविण्याचें कबूल करून, इंग्लिशांनीं, इ० स० १८०२ च्या दिसेंबर महिन्यांत वसई येथें त्याशीं तह केला, तेणेंकरून त्याच्या दरबारांतले इतर सर्व मुत्सद्यांचें माहात्म्य नाहींसें

होऊन, तो स्वतः इंग्लिशांचा अंकित झाला, आणि ते सांगतील तसें वागूं लागला, हें एक कारण; आणि सालप्यांच्या तहाच्या वेळीं शिंद्याचें मत जसें अगोदर विचारिलें होतें, तसें ह्या वसईच्या तहाच्या वेळीं झालें नाहीं, हें दुसरें कारण; ह्या दोन कारणांवरून शिंद्यास फार राग आला. तरी कांहीं वेळपर्यंत तो त्यानें बाहेर दाखविला नाहीं. पेशव्यांप्रमाणें तुह्मींही आह्मांशीं तह करावा, असें गव्हरनर जनरलानें त्यास पुष्कळ सांगितलें. परंतु, तो सरळ असें कांहींच उत्तर देईना. त्याच्या सैन्याची कडीकोट तयारी चालली, आणि वऱ्हाडचा राजा भोंसला त्यास अनुकूल झाल्याची खबर इंग्लिश सरकारास समजली. आणखी, पेशव्यांच्या मुलुखामध्यें प्रथम दंगा करावा, असा त्यांचा रोख दिसला. आणि त्यास त्याच्या सर्व प्रकारच्या संरक्षणाविषयीं तर इंग्लिश सरकारानें वचन दिलें होतें. तेव्हां त्या दोन राजांच्या बंदोबस्ताकरितां आणि पेशव्याचें साह्य करण्याकरितां सैन्याची सिद्धता करणें इंग्लिश सरकारास भाग पडलें. त्या वेळीं कर्नल आर्थर वेल्सली हा म्हैसुरामध्यें आपल्या कामांत अगदीं गढून गेला होता. तरी, हें इकडचें वर्तमान समजतांच पुढें होणाऱ्या युद्धाविषयीं तो विचार करूं लागला. ह्या वेळीं आपणास मोहिमीवर जायास सांपडेल तर बरें होईल असें त्याला वाटे; परंतु, आपली योजना तिकडे व्हावयाची नाहीं, असें तो खास समजत असे. तथापि जे कोणी त्या कामावर जातील त्यांस तें उत्तम रीतीनें करितां यावें ह्याकरितां त्यानें तपशीलवार एक सूचनापत्रक तयार केलें. इतकी त्याला सरकारी कामाची आस्था होती. शिंद्याशीं जी लढाई पुढें होण्याचा रंग दिसत आहे, तिजवर आपणास कोणी नेमणार

नाहीं, असें कर्नल वेल्सली ह्यास मात्र वाटत होतें. परंतु ह्या कृत्यास योग्य असा त्यावांचून दुसरा एकही पुरुष आपणांकडे नाहीं, असें इंग्लिश सरकारास खचीत माहीत होऊन, त्यांनीं एकदम त्यास त्या स्वारीच्या कामावर नेमिलें. हा हुकूम पाहून त्याला फार आनंद झाला. तो अगदीं आलीकडचा नौकर असून त्यास एवढें मोठें काम एकदम सांगणें, आणि इतरांचे हक्क एके बाजूस ठेवून त्यास इतकें चढविणें, हें अप्रशस्त आहे, अशी तकरार कांहीं मत्सरी लोकांनीं सरकारांत केली होती; परंतु तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ह्या वेळापूर्वीं नुकताच त्याला मेजर जनरल असा हुद्दा मिळाला होता, हें एक त्याच्या बढतीस चांगलें साधन झालें. ह्या आपल्या नवीन नेमणूकीवर इ० स० १८०३ च्या फेब्रुआरी महिन्यांत तो रुजू झाला. आणि एतद्देशीय राजांशीं वागण्याच्या संबंधाचे सर्व लष्करी आणि मुलकी अधिकार त्यास मिळाले.

जनरल वेल्सली ह्यानें जेव्हां हें नवें काम आपले हातीं घेतलें, तेव्हां मराठ्यांशीं उघड वैर चालू झालें नव्हतें. तरी शिंदा आणि वऱ्हाडचा राजा हे एक झाले होते, आणि त्यांविषयीं पेशव्यास फार भय वाटत होतें. एवढ्याच कारणावरून जनरल वेल्सली ह्यानें कांहीं सैन्य पेशव्यांच्या मुलुखांत नेऊन ठेविलें. तेव्हां इंग्लिशांनीं पेशव्यांचा पक्ष खचीत उचलिला आहे, असें शिंदा आणि वऱ्हाडचा राजा ह्यांस स्पष्ट समजलें आणि त्याप्रमाणें ते आपल्या सैन्यांची तयारी करूं लागले. ह्या प्रकारेंकरून, उभयपक्षांमधलें वैमनस्य उघड होऊन युद्ध मांडलें. इंग्लिशांकडच्या सरदारांचा सगळा डोळा शिंद्याच्या लष्करांतील फ्रेंच लोकांवर

होता. कारण, त्याच्या सगळ्या उड्या त्यांच्या बळावर होत्या. मराठ्यांच्या सैन्याशीं युद्ध करण्याच्या कामावर गव्हरनर जनरलानें लार्ड लेक आणि जनरल वेल्सली ह्या दोघां सरदारांची योजना केली. त्यांपैकीं लार्ड लेक ह्यानें, शिंद्याकडे फ्रेंचांचें मोठें माहात्म्य वाढलें होतें तें युक्तीच्या पोटीं किंवा युद्ध करून मोडून टाकावें, आणि दुवाब, बुंदेलखंड, दिल्ली, आग्रा, आणि यमुनेच्या उजव्या किनाऱ्यावरील ठाणीं इतकीं हस्तगत करून घ्यावीं, असें ठरविलें होतें. आणि जनरल वेल्सली ह्यास असा हुकूम झाला होता कीं, शिंदे, होळकर, आणि वऱ्हाडचा राजा हे आपआपल्या सैन्यांसहवर्तमान शांतपणें आपापल्या मुलुखांत जातील अशी तजवीज तुह्मीं करावी; आणि ते राजे जर गोडीगुलाबीनें न ऐकतील तर त्यांस आपल्या इच्छेप्रमाणें, हरप्रयत्नानें ताळ्यावर आणावें. आणखी ह्या महत्कृत्यास जे अधिकार व जें युद्धसाहित्य आवश्यक होतें, तें सर्व त्यास दिलें होतें. इतकी सिद्धता झाल्यावर जनरल वेल्सली ह्यानें शिंद्यास असें लिहून पाठविलें कीं, "वसईचा तह जो झाला आहे, तो केवळ स्नेहवृद्ध्यर्थ झाला आहे. त्यांत कांहीं एक वाईट हेतु नाहीं. असें असतां एतद्देशीय राजेरजवाडे त्याविषयीं भलभलत्याच कल्पना मनांत आणून, वैरभाव धरितात, ही गोष्ट फार दुःखाची आहे. तुह्मी आपलें सैन्य भोंसल्याच्या सैन्यापासून वेगळें करून नर्मदापार परत न्यावें, ह्मणजे आह्मी-ही आपलीं हीं सैन्यें जिकडचीं तिकडे पाठवितों." ह्या प्रमाणें शिंद्यास लिहून गेल्यावर, त्यानें त्या दरबारच्या रेसिडेंतास असें लिहून कळविलें कीं, "शिंदसरकारास जें पत्र इकडून गेलें आहे, त्याप्रमाणें वागण्याचा त्यांचा रंग जर तुह्मांला

दिसला नाहीं, तर तेथून लागलेंच निघून इकडे यावें." हीं पत्रें तारीख १४ माहे जुलै सन १८०३ इ० रोजीं रवाना झालीं. शिंद्यानें आपल्या पत्राचें उत्तर प्रथम बरेच दिवस पर्यंत लांबणीवर टाकिलें; आणि शेवटीं असें लिहून पाठविलें कीं, "आह्मी आपल्या स्वतःच्या मुलुखामध्यें आहों; तथापि, अजिंठ्याच्या पलीकडे आह्मी येणार नाहीं, एवढें मात्र आपणांस कळवितों. वसईच्या तहाविषयीं आम्हीं आपला अभिप्राय गव्हरनर जनरल ह्यास कळविला आहे; त्यांत आह्मी हात घालणार नाहीं." ह्या उत्तरावरून, शिंद्याचा सगळा हेतु जनरल वेल्सली ह्यास समजला; ह्मणजे, तो सोईच्या पोटीं तह करण्यास मान्य नाहीं, असें स्पष्ट त्याच्या मनांत आलें. इतक्यांत, त्याच्या दरबारचा रेसिडेंतही, तेथला विपरीत प्रकार दृष्टीस पडल्या बरोबर, तेथून निघून आला. मगतर शिंद्याच्या वैरभावाविषयीं तिळभर देखील शंका राहिली नाहीं. नंतर, लागलाच जनरल वेल्सली आपल्या सैन्यासहवर्त्तमान अहमदनगरावर आला. तेथील किल्ल्यावर आणि शहरांत शिंद्याच्या लोकांनीं बराच बंदोबस्त ठेविला होता. जनरल वेल्सली ह्यानें आगस्त महिन्याच्या ९ व्या तारखेस किल्ला आणि शहर ह्यांचे मधील जागा जिंकून घेऊन तेथें आपला अमल बसविला. नंतर तेथें एक मोठा बुरूज उभारून त्यावर तोफा चढविल्या. तेव्हां किल्लेदारास फार भय वाटलें, आणि तो शरण येण्यास मान्य झाला. त्याचें ह्मणणें एवढेंच होतें कीं मला माझे लोक आणि खासगी सामान इतक्यांसहवर्तमान सुरक्षितपणें निघून जाण्याची मोकळीक असावी. हें त्याचें ह्मणणें जनरल वेल्सली ह्यानें कबूल केल्यावर, आणि त्याप्रमाणें सगळ्या तज-

विजी झाल्यावर, आगस्त महिन्याच्या ११ व्या तारखेस तो किल्ला त्याचे हस्तगत झाला. ह्या ठिकाणीं चौदाशें लोक जनरल वेल्सली ह्यानें धरून कैद करून नेले, असें आलिसन नामक ग्रंथकारानें लिहिलें आहे.

आपला अहमदनगरचा बळकट किल्ला इंग्लिश सरदारांनीं घेतला, असें शिंद्यास समजतांच, तो आपलें सैन्य घेऊन तावडतोबड दक्षिण हिंदुस्थानाकडे आला. अहमदनगराकडे येण्यास त्याला धैर्य होईना; ह्मणून तो औरंगाबादेच्या लगत्यास हिंडूं लागला. त्याच्या मनांत निजामास भयभीत करून आपणाकडे वळवून घ्यावयाचें होतें. परंतु, हें त्याचें मनोगत जनरल वेल्सली ह्यास तेव्हांच समजलें, आणि तो त्याच्या बंदोबस्ताकरितां गोदावरीनदीच्या पूर्व किनाऱ्याकडे गेला. तेव्हां, अर्थातच शिंद्याचा हेतु व्यर्थ गेला, आणि त्यास आपल्या स्वारीचा रोंख बदलणें भाग पडलें. ह्या प्रसंगीं मोठ्या त्वरेनें औरंगाबादेकडे येऊन, जनरल वेल्सली ह्यानें शिंद्यास आणि वऱ्हाडच्या राजास दूर घालवून दिलें ह्मणून बरें झालें. नाहींतर, त्यांच्या धमक्यांनीं हैदराबादवाले त्यांस कदाचित् अनुकूल झाले असते, असें वाटतें. कारण, तेथल्या गादीचा मुख्य पराक्रमी मालक निजामअल्ली हा त्याच महिन्याच्या ६ व्या तारखेस निवर्तल्यामुळें त्याचा मुलगा शिकंदरजाहा हा सिंहासनारूढ व्हावयाचा होता, आणि तत्संबंधीं त्या दरबारांत मोठी गडबड चालली होती.

आतां एका मोठ्या युद्धप्रसंगाचें वर्णन लवकरच करायाचें आहे. ह्यास्तव, उभयपक्षांकडील सैन्यबळाचें ठोकळ प्रमाण आधीं सांगणें हें आवश्यक आहे, असें वाटतें. इंग्लिशांकडचा मुख्य सरदार जनरल वेल्सली ह्याचे

हाताखालीं, गोरे आणि काळे मिळून स्वतःचे असे ४९०० लोक होते; शिवाय त्याच्या साह्यास ह्मैसुराकडून आणि मराटे लोकांकडून मिळून एकंदर ५४०० लोक आले होते; हे बहुतेक स्वार होते. जनरल वेल्सली ह्याचे हाताखालीं कर्नल स्तीव्हनसन होता; त्याचे हाताखालीं सुमारें २४००० लोक होते. इतकें सैन्य इंग्लिश पक्षाकडे होतें:—शिंद्याकडे त्याचे स्वतःचे १८५०० स्वार, आणि ८२०० पायदळ इतके लोक होते; आणि त्याचे बरोबर जो वऱ्हाडचा राजा भोंसला होता, त्याचे बरोबर २०००० स्वार आणि ६००० पायदळ इतके लोक होते. ह्याशिवाय ह्या मराठ्यांच्या लष्कराबरोबर पेंढारी वगैरे लोक हजारों होते ते वेगळेच. ह्या उभयपक्षांच्या सैन्यांची तुलना, केवळ संख्येच्या मानावर करून पाहिली ह्मणजे, इंग्लिशांकडचें सैन्य मराठ्यांकडच्या सैन्यापुढें कांहीं नव्हतें असें कोणाच्याही मनांत आल्या वांचून राहणार नाहीं.

हीं दोन्हीं सैन्यें एकमेकांची पालथ राखून मोठ्या सावधगिरीनें हिंडत होतीं. मराठ्यांचें सैन्य इंग्लिशांकडच्या सैन्यापेक्षां पुष्कळ अधिक होतें; आणि शिंदा व भोंसला ह्यांचे सरदार बरेच शूर होते. तरी, आपण होऊन इंग्लिश सैन्यावर चाल केली असतां काय होईल कोण जाणें असें त्या दोघांही राजांस वाटत असे. तथापि तें ते बाहेर दाखवीत नसत. अजिंट्याच्या एका बाजूकडे ह्यांनीं धामधूम करीत फिरावें, आणि दुसऱ्या बाजूकडे त्यांनीं फिरावें, असें होतां होतां त्यांची समोरासमोर गांठ पडण्याचा प्रसंग प्राप्त झाला. खेळणानदीच्या उजव्या तीरावर आसई येथें इंग्लिशांचें सैन्य दाखल झालें तेव्हां तिच्या डाव्या बाजूस शिंदा आणि भोंस-

ला ह्यांचीं एकत्र झालेलीं सैन्यें मोठ्या थाटानें छावणी करून राहिलीं आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें तें मराठ्यांचें सैन्य जबरदस्त होतें, आणि इंग्लिशांचें त्याच्या मानानें फारच थोडें होतें; तरी, पलीकडे जाऊन शत्रूवर एकदम हल्ला करावयाचा निश्चय जनरल वेल्सली ह्यानें केला. प्रथम इंग्लिशांकडच्या तोफा सुटूं लागल्या. त्यांप्रमाणें मराठ्यांनीं आपल्या तोफांचा भडिमार इंग्लिशांकडच्या सैन्यावर चालविला. त्यांच्या तोफखान्यास जागा चांगली माऱ्याची सांपडली होती, आणि जनरल वेल्सली ह्याच्या लष्कराची व्यवस्था प्रथम कांहीं वेळ लागली नव्हती; ह्यामुळें आरंभीं इंग्लिश सैन्यामध्यें बराच घोंटाळा झाला, आणि तोफखान्याचे बैल पुष्कळ मेले, तेणेंकरून कितीएक तोफा मागें टाकून त्यांस शत्रूंशीं सामना करण्यास पुढें सरसावावें लागलें. हे इंग्लिशांकडचे एवढेसे लोक आपल्या एवढ्या मोठ्या प्रचंड सैन्यापुढें मोठ्या धैर्यानें आणि जय मिळेल अशा खातरीनें येत आहेत असें पाहून मराठ्यांच्या लष्करांतील लोकांस मोठें आश्चर्य वाटलें, आणि थोडें भयही उत्पन्न झालें. त्यांच्या योगानें कांहीं पळेंपर्यंत थक्क होऊन त्यांजकडे पाहात ते तटस्थ उभे राहिले. इंग्लिशांकडचे लोक जवळ येऊन भिडतांच, मराठ्यांच्या सैन्याच्या अग्र भागच्या पहिल्या ओळीनें पळ काढिला. तेव्हां त्यांच्या मागचेही लोक घाबरल्यासारखे झाले. तरी, त्यांच्याकडच्या तोफखान्यानें आपलें काम बऱ्याच धैर्यानें चालविलें होतें. त्यामुळें, कर्नल माक्सवेल यानें त्याजवर हल्ला करून त्यास मागें हटविलें. त्या वेळीं मराठ्यांच्या सैन्यामध्यें सगळा गोंधळ होऊन, त्यांतले लोक आपापले जीव घेऊन पळत

सुटले. त्यांच्या मागें इंग्लिशांकडचे लोक लागले. मराठ्यांकडील तोफखान्याचे लोक कांहीं वेळपर्यंत अगदीं मेल्याप्रमाणें तोफांजवळ पडले. ते खरोखरच मेले आहेत असें समजून, त्यांजकडे लक्ष न देतां इंग्लिशांकडचे लोक अगदीं त्यांच्या जवळून गेले. ते आपणां पासून अमळसे दूर गेले, असें दृष्टीस पडतांच, ते मेल्यांचें सोंग घेतलेले लोक भराभरा भराभरा उठले, आणि इंग्लिशांच्या सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव करूं लागले. त्याच्या योगानें त्यांचा फार नाश झाला, आणि ते किंचित् गोंधळल्यासारखे दिसूं लागले. तेव्हां, जनरल वेल्सली ह्यानें पुढें सरसावून, त्यांस धैर्य दिलें, सर्व व्यवस्था पूर्वस्थितीस आणिली, आणि मोठ्या निकरानें पुनः शत्रूंवर हल्ला केला. तेव्हां ते केवळ पराभव पावून पळूं-लागले. ह्या तुमुल युद्धामध्यें जनरल वेल्सली ह्याच्या खालच्या घोड्यास गोळी लागून तो पडला, आणि लागलाच मरण पावला. परंतु, सुदैवेंकरून त्याच्या वरच्या विजयी आणि पराक्रमी पुरुषास कांही एक इजा झाली नाहीं. हा योद्धा ह्या प्रसंगीं खचीत पडावयाचा, परंतु त्याच्या हातून ह्याहून मोठमोठे पराक्रम होऊन, त्यांच्या योगानें ह्याची कीर्ति सर्व पृथ्वीभर पसरावी, असा परमेश्वराचा संकेत होता; ह्मणूनच ह्या वेळीं त्याचें रक्षण झालें, असें ह्मटलें पाहिजे. कर्नल माक्सवेल हाही ह्या प्रसंगीं मोठ्या शौर्यानें लढला; परंतु, त्यास एकाएकीं एक गोळी मर्मीं लागून तो समरांगणांत पतन पावला. मराठ्यांच्या सैन्याचा पराभव झाला, आणि इंग्लिशांच्या सैन्यास जय मिळाला. ही लढाई इ० स० १८०३ च्या सप्तेंबर महिन्याच्या २३ व्या तारखेस झाली, ती एकसारखी एक प्रहर चालली होती. हिजमध्यें मरा-

ह्यांकडचे १२०० लोक तर समरांगणीं मेले; आणि जखमी झालेल्या लोकांनीं आसपासचा सगळा प्रदेश भरला होता, असें सांगतात. इंग्लिशांकडच्या मेलेल्या आणि जखमी झालेल्या लोकांची गणती केली, ती एकंदर १५६६ भरली. पुष्कळ दारू गोळा, कांहीं निशाणें, उंटें, बैल, ९८ मोठमोठ्या तोफा, आणि पुष्कळ दुसरें सामान इंग्लिशांच्या हातीं लागलें.

ह्या लढाईमध्यें मराठ्यांचा पराजय आणि इंग्लिशांचा जय झाला, ह्याविषयीं कांहीं संशय नाहीं. परंतु ह्या प्रसंगीं मराठ्यांचें युद्धकौशल्य पुष्कळ दिसून आलें, हेंही कबूल केलें पाहिजे. ही गोष्ट इतर लोक खरी ह्मणतील ह्यांत कांहीं नवल नाहीं. स्वतः जनरल वेल्सली ह्यानें देखील एका पत्रामध्यें असें लिहिलें आहे कीं, "आजपर्यंत एतद्देशीय राजांचीं जीं सैन्यें मीं पाहिलीं, त्यांमध्यें ह्या लष्करांतील पायदळ खरोखर फार उत्तम होतें. तें आमच्या पायदळापेक्षां पुष्कळ कमी योग्यतेचें होतें; परंतु, टिपूच्या पेक्षां फार चांगलें होतें." ह्या लेखावरून, चांगल्यास चांगलें ह्मणण्याविषयीं जनरल वेल्सली ह्याची निस्पृहता, आणि मराठ्यांच्या सैन्याची खरी योग्यता ह्या स्पष्ट दिसून येतात; आणि ह्या दोन्ही खरोखर स्तुतिपात्र होत.

आसई येथें जनरल वेल्सली ह्यानें शिंद्याच्या व वऱ्हाडच्या राजाच्या एकत्र सैन्यांचा पराभव सप्तेंबरच्या तेविसाव्या तारखेस केल्याचें वर्तमान वर लिहिलेंच आहे. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं उत्तर हिंदुस्थानामध्यें जनरल लेक ह्यानें शिंद्याच्या सैन्याचा इतका मोड करून टाकिला कीं, त्यांतले सगळे फ्रेंच सरदार त्यास शरण आले. उत्तर हिंदुस्थानामध्यें जनरल लेक ह्यानें ह्या सुमारास ज्या लढाया मारिल्या,

त्या वर्णनीय आहेत; परंतु, त्यांचा संबंध प्रकृत विषयाकडे इतका निकट दिसत नाहीं, ह्यास्तव त्यांविषयीं फारसें लिहीत नाहीं. परंतु, इकडे जनरल वेल्सली ह्यानें जें कांहीं केलें, त्यास जनरल लेक साहेबाच्या कृत्यांच्या दराऱ्यानें पुष्कळ भर पडून, शिंदा हा पुष्कळ नरम होऊन, इंग्लिशांशीं तह करण्याचा विचार करूं लागला. ह्या वेळीं त्याजपाशीं बाळोजी कुंजर कारभारी होता. हा कुंजर पूर्वीं बाजीराव पेशव्यापाशीं होता. वसई मुक्कामीं तह ठरल्यावर, पेशव्याच्या मनांत असें आलें कीं, ह्या तहाच्या कामीं आपण शिंद्याचा विचार मुळींच घेतला नाहीं, ह्यामुळें त्यास कदाचित् राग येईल. ह्मणून, त्यास समजून सांगण्याकरितां त्यानें ह्या कुंजरास शिंद्याकडे पाठविलें होतें. तो जो निरोप सांगावयास ह्मणून इकडे आला, तो इकडेच राहिला. त्याजवर राणोजी भोंसल्याचा फार लोभ असे. त्यानें, शिंदा अथवा वऱ्हाडचा राजा ह्यांचें नांव मुळींच न घालितां, जनरल वेल्सली आणि कर्नल स्टीव्हनसन ह्यांस असें लिहून पाठविलें कीं, "कपतान जानसन* आणि राजा महिपतराम* ह्यांस तहाचा विचार करण्याकारितां आमच्या लष्करांत पाठवून द्यावें. नवाब मुनीर उल्मुलुक ह्यांचीही अशी इच्छा आहे कीं, ईश्वराच्या कृपेंकरून उभयतां सरकारांचा स्नेहभाव असावा." हें पत्र पाहून जनरल वेल्सली ह्यास मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें त्याला लागलेंच असें उत्तर दिलें कीं, "नवाब मुनीर उल्मुलुख हे कोण आहेत, हें आह्मांस मुळींच ठाऊक नाहीं; आणि

---

* निजामाकडून जी फौज जनरल आर्थर वेल्सली ह्याच्या साह्यास आली होती, तिजमधील हे कामदार होत.

आह्मांस असें कळविण्यास त्यांस काय अधिकार आहे, हेंही समजत नाहीं. आह्मांस कांहीं तहाचें बोलणें लावावयाचें नाहीं, आणि ह्यास्तव आह्मी त्या उभयतांस तिकडे पाठवीत नाहीं. आह्मांला तर खचीत असें वाटतें कीं, आह्मांस जर कांहीं बोलणें लावावयाचें असतें, आणि त्याकरितां जर हे गृहस्थ आह्मीं पाठविले असते, तर शिंदेमहाराजांनीं ह्यांची मुलाकत खचीत घेतली नसती. महाराजांपाशीं सरदार पुष्कळ आहेत. आणि महाराजांच्या अथवा वऱ्हाडच्या राजाच्या मनांत जर आह्मांशीं कांहीं बोलणें लावावयाचें असलें, तर त्यांनीं आपले एकदोन सरदार अह्मांकडे पाठवावे. ह्या कामाकरितां जे कोणी सरदार येतील, त्यांच्या योग्यते-प्रमाणें आह्मीं त्यांचा मानमरातब राखूं, आणि ते जें कांहीं बोलतील त्याचा योग्य रीतीनें विचार करूं."

ह्याप्रमाणें तहाविषयीं बोलणें बाह्यात्कारें चाललें होतें; परंतु शिंद्याचें अंतर्याम शुद्ध नव्हतें. त्याच्या फौजेची आं-तून आंतून तयारी चालली होती, वऱ्हाडच्या राजाशीं त्याचें सख्य होतें तसेंच होतें, आणि, इंग्लिशांच्या सैन्यावर कोणी कडून हल्ला केला असतां आपला लाग साधेल, ह्याविषयीं ते गुप्तपणें विचार करीत होते. हें सगळें वर्तमान जनरल वेल्सली ह्यास माहीत होतें, आणि त्याप्रमाणें तो युद्ध करण्या-स सिद्ध होता. इतक्यांत शिंदे आणि भोंसले ह्यांनीं आपा-पलीं सैन्यें वेगळीं वेगळीं काढिलीं; भोंसल्यांचें सैन्य चांदो-रीकडे वळलें, आणि शिंद्यांचें सैन्य अशीरगडाकडे चाललें, इतक्यांत जनरल वेल्सली हा आपल्या सैन्यासहवर्तमान आजें-ठाघाट उतरून खालीं आला, आणि त्यानें शिंद्याचें पुढें येणें बंद केलें.

पुढें फिरतां फिरतां शिंदा आणि भोंसला ह्यांचीं सैन्यें एकत्र झालीं, आणि त्यांनीं आपली छावणी अरगांवाजवळ दिली. हें जनरल वेल्सली ह्यास समजलें. तेव्हां, त्या ठिकाणाच्या सुमारास आपणास येऊन मिळण्याविषयीं त्यानें कर्नेल स्टीव्हन्सन ह्यास हुकूम पाठवून आपण तिकडचा मार्ग धरिला. अरगांवाजवळ मराठ्यांच्या सैन्याची तयारी विशेष होती. शिंद्यानें आपल्या सैन्याचें आधिपत्य आपण स्वतः पतकरिलें होतें; आणि वऱ्हाडच्या राजाच्या सैन्यावर त्याचा भाऊ मनूबापू हा मुख्य झाला होता. उभय पक्षांचीं सैन्यें हळू हळू जवळ जवळ येतां येतां, नोवेंबर महिन्याच्या अखेरीस त्यांचें मोठें युद्ध झालें. त्यांत मराठ्यांचा पराभव झाला, आणि जनरल वेल्सली ह्यास जय मिळाला. ही लढाई होतां होतां दिवस मावळून रात्र पडली; परंतु इंग्लिश सैन्यानें शत्रूचा पाठलाग सोडिला नाहीं. मराठ्यांच्या सैन्याची अगदीं दुर्दशा उडाली. त्यांचे किती लोक ह्या वेळीं मरण पावले हें बरोबर समजत नाहीं; परंतु त्यांचा फार नाश झाला असें पुस्तकांतून मोहगम लिहिलें आहे. त्यांचे पुष्कळ हत्ती आणि सामानसुमान इंग्लिशांच्या हातीं लागलें. त्यांजकडले मेलेले आणि जखमी झालेले ह्यांची गणती केली ती ३४६ भरली.

अरगांवचे लढाईमध्यें जनरल वेल्सली ह्यास पराकाष्ठेचे श्रम पडले. त्याविषयीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, तो त्या दिवशीं सूर्योदयापासून तों मध्यरात्रीपर्यंत एकसारखा घोड्यावर बसून इकडे तिकडे हिंडत होता. बरें, तो इतका दमला होता, आणि त्याला जय मिळाला होता, ह्मणून तो विसांवा घेत स्वस्थ राहिला काय? नाहीं. लागलाच दुसरे दिवशीं, तो गाविलगड ह्मणून वऱ्हाडच्या राजाचा जो एक

फार मजबूद किल्ला होता, त्यावर आपलें सैन्य घेऊन गेला. तेथें चांगला बंदोबस्त होता. त्या किल्ल्यासभोंवतीं एकीच्या आंत दुसरी अशा तीन भिंती होत्या, आणि आंत दारूगोळा व तोफा पुष्कळ होत्या. दिसेंबरच्या बाराव्या तारखेपासून तीन दिवस पर्यंत एकसारखे हल्ले करितां करितां, १४ व्या तारखेस किल्ल्याच्या भिंतींस भोंकें पाडून, त्यांच्या द्वारें इंग्लिशांचा प्रवेश आंत झाला. आंतले लोक जीवांवर उदार होऊन लढले, तरी इंग्लिशांच्या सैन्यापुढें त्यांचें कांहीं चालेना. शेवटीं ते पराभव पावून विजयी लोकांच्या स्वाधीन झाले. त्यांच्यांतले पुष्कळ लोक पडले. त्यांतच तेथला शूर किल्लेदार आणि रजपूत लोकांचा धैर्यवान सरदार बेनीशिंग हे दोघे मरण पावले.

शत्रु अडथळा करीनातसे झाल्याबरोबर जनरल वेल्सली किल्लेदाराच्या घराकडे गेला, आणि तो कोठें आहे ह्मणून विचारूं लागला. तेव्हां त्याच्या मुलानें त्यास सांगितलें कीं, तो चार साहा घटिकांच्या पूर्वीं जो बाहेर गेला, तो अद्याप परत आला नाहीं. हा मुलगा सगळा दाहा वर्षांचा होता; आणि हा रूपानें सुंदर असून मोठा पाणीदार दिसे. किल्लेदार घरांत नाहीं, असें पाहून जनरल वेल्सली ह्यानें त्याच्या शोधास मनुष्यें पाठविलीं. तेव्हां शोधितां शोधितां, शेवटीं, वेशीपाशीं जो प्रेतांचा खच पडला होता त्यामध्यें त्याचें प्रेत सांपडलें. आपणास जय प्राप्त होत नाहीं, असें वाटल्याबरोबर, किल्लेदार आणि बेनीशिंग ह्यांनीं आपल्या चालीप्रमाणें, आपल्या कुटुंबांतल्या बायकांवर शस्त्रप्रहार केला; आणि त्या सगळ्या मेल्या असें दिसल्यावर ते आपण स्वतः युद्धांत शिरले. आपल्या पवित्र कुळांतल्या बायकांच्या पाति-

व्रताचा भंग आणि अपमानास्पद विटंबना हीं शत्रूस क-रितां येऊं नयेत, ह्मणून त्यांनीं हा एवढा निर्दयपणाचा उ-द्योग केला होता. ह्यांपैकीं तीनचार बायका मात्र अगदीं ठार मरून पडल्या होत्या, आणि बाकीच्यांच्या जखमांतून रक्ताचे प्रवाह वाहात असून त्या मूर्छित होऊन पडल्या होत्या. ती त्यांची अवस्था पाहून जनरल आर्थर वेल्सली ह्यास फार वाईट वाटलें. त्यानें त्या जीवंत बायकांच्या जखमा बांधवि-ण्याची व त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या सर्व सोईची तजवीज केली. शत्रूस जिंकणें हें शूराचें काम आहे; परंतु त्याच्या बायकामुलांचे हाल करणें हें अगदीं नीच आणि मूर्खपणाचें काम आहे, असें इंग्लिश सरदार समजतात, आणि त्याप्रमाणें वागतात. ही गोष्ट हिंदुस्थानाच्या इतिहासांत वारंवार दृष्टीस पडते. धोंड्या वाघाच्या मुलाची तजवीज जनरल वेल्सली ह्यानें आपल्या पदरच्या पैशानें कशी केली, ह्याविषयीं जें मागें सांगितलें आहे, तें आमच्या वाचकांच्या लक्षांत असेलच.

गाविलगडच्या लढाईचा परिणाम असा झाल्यावर, वऱ्हा-डचा राजा राणोजी भोंसला ह्याची उमेद अगदीं खचून गेली, आणि इंग्लिश सरकाराशीं स्नेहभावाचा तह ठरवि-ल्याशिवाय, आपणास स्वस्थता प्राप्त व्हावयाची नाहीं, अशी त्याची खातरी झाली. तेव्हां त्यानें लागलाच आपला वकील तहाचें बोलणें लावण्याकरितां जनरल वेल्सली ह्याजकडे पाठविला. त्यास, अशा अशा प्रकारें प्रांत देण्यास आणि हक्क सोडण्यास तुमच्या यजमानाची मर्जी असेल तर तह होईल, एरव्हीं व्हावयाचा नाहीं, असें त्यानें सांगितलें. तेव्हां, तें ह्मणणें फार जबरदस्तीचें आहे, असें त्यास वाटून फार राग आला, आणि त्यानें असें ह्मटलें कीं, " असा तह

कबूल करून घेण्यापेक्षां भोंसल्याच्या राज्याचा एकदम वि- ध्वंस करून टाकावा, हें बरें." त्यावर, जनरल वेल्सली ह्यानें फार शांतपणानें त्यास उत्तर दिलें, "तुमचा राजा मोठा विचारी होता, तर, आह्मांशीं युद्ध करण्यास आरंभ करण्या- पूर्वीं त्यानें आपल्या बलाबलाचा पुरता विचार करावयाचा होता. हा विचार न करितां त्यानें एकदम आह्मांशीं वैर बांधिलें, त्याचें फळ त्यानें आतां निमूटपणें सोशिलें पाहिजे." इतकें झाल्यावर, इंग्रज सरकारच्या अटींप्रमाणें तह कबूल केल्यावांचून आपला निर्वाह नाहीं, असें भोंसल्यास पकें वा- टल्यावरून त्यानें तेविसाव्या तारखेस तहाचीं सर्व कलमें मान्य केलीं. त्या कलमांमध्यें मुख्य गोष्टी दोन होत्या; त्या ह्या कीं, कटक आणि बलसोरा हे प्रांत, त्यांतील किल्ल्यांसह इंग्लि- शांच्या स्वाधीन करावे; आणि ज्या राष्ट्रांशीं इंग्लिश सरकारचें वैमनस्य आलें असेल, त्यांतील लोक आपल्या चाकरीस ठेवूं नयेत. आणखी एका कलमावरून, भोंसल्याच्या दरबारा- मध्यें इंग्लिश सरकारचा रसिदेंत ठेवावा, असें ठरलें होतें. त्याप्रमाणें त्या कामावर जनरल वेल्सली ह्यानें आनरेबल मौंत स्तुअर्त एलफिनस्तन ह्याची योजना केली. ही योग्य मनु- ष्याची नेमणूक योग्य स्थलीं झाली, असें सर्वांस वाटलें.

भोंसल्याशीं तह ठरून, त्याचें लष्कर शांतपणानें जिकड- चें तिकडे जाऊं लागलें, आणि त्या संबंधाची गडबड मो- डत चालली, तरी शिंद्यानें तहाचें बोलणें जें बरेच दिवसां- पासून लाविलें होतें, तें तसेंच राहिलें होतें. तो इंग्लिशांच्या ह्मणण्याप्रमाणें धड तह करीना, आणि आपला हेतुही स्पष्ट- पणें सांगेना. हें संशयाचें मौन कांहीं उपयोगाचें नाहीं, कारण ह्यापासून केव्हां काय उद्भवेल ह्याचा नेम नाहीं असें

मनांत आणून, जनरल वेल्सली ह्यानें त्यांस असें सांगून पाठविलें कीं, तुह्मांस कांहीं विशेष बोलणें कळवावयाचें असल्यास तें लवकर कळवून, दिसेंबरच्या सत्ताविसाव्या तारखेच्या आंत काय तो निकाल करून घ्यावा; नाहींतर, तुह्मी तहास मान्य नाहीं, असें समजून, सत्ताविसाव्या तारखेस आह्मी पुनः युद्धास आरंभ करूं. हा निरोप पोंचायाच्या संधीस दुसरी अशी एक गोष्ट झाली कीं, पेंढाऱ्यानीं धारूरानजीक कृष्णा नदी उतरून आसपासच्या मुलुखामध्यें झोटिंगबादशाही मांडिली होती; त्यांजवर मेजर जनरल क्यांबेल ह्या इंग्लिश सरदारानें तारीख २८ दिसेंबर रोजीं हल्ला करून, त्यांचा अगदीं मोड करून टाकिला; तो इतका कीं, त्यांचे मेलेले आणि जखमी झालेले ह्यांची एकंदर गणती तीन हजारांहून अधिक होऊन, बाकीचे सर्व लोक आपले जीव घेऊन दश दिशा पळून गेले; हें वर्तमान शिंद्यास कळलें. तेव्हां त्यास इंग्लिश सरकारच्या सामर्थ्याविषयीं, आणि आपल्या दुर्बलपणाविषयीं शंका नाहींशी होऊन, त्यानें लागलाच, दिसेंबरच्या तिसाव्या तारखेस सरजेअजिणगांव येथें इंग्लिश सरकाराशीं तह ठरविला. त्यावरून गंगा आणि यमुना ह्यांच्या मधला त्याचा मुलुख; जयपूर, जोधपूर आणि गोहद ह्यांच्या उत्तरेकडचा त्याचा मुलुख; भडोचचा किल्ला; अहमदनगरचा किल्ला, व थोडासा खेरिज करून त्याच्या खालचा सर्व प्रांत; लढाईस आरंभ होण्यापूर्वीं अजिंठा आणि गोदावरी ह्यांच्या मध्यें जो मुलूख त्याजकडे होता तो; इतकें त्यानें इंग्लिश सरकारास देण्याचें ठरवून, मोंगल बादशाहावर माझा कांहीं हक नाहीं, पेशव्यांच्या संबंधानें इंग्रज सरकार जें कांहीं मला सांगेल त्याप्रमाणें मी वागेन, आणि फ्रेंच लोकांस अथवा

ज्यांशीं इंग्रज सरकाराचें वैर येईल त्यांस मी आपले चाकरीस ठेवणार नाहीं, असें त्यानें कबूल केलें. आणखी त्याचे दरबारीं इंग्लिश सरकारचा वकील असण्याविषयीं ठराव झाल्यावरून त्या कामावर जनरल वेल्सली ह्यानें मेझर मालकम ह्याची योजना केली. हाच पुरुष पुढें मोठी योग्यता पावून, सरजान मालकम ह्या नामेंकरून प्रसिद्धीस आला.

मेजर मालकम ह्याची नेमणूक वकिलीच्या जागीं झाल्यावर, तो आपले कामावर लागलाच रुजू होऊन, शिंदे सरकारच्या मुलाकतीस गेला. त्याची भेट त्या दिवशीं एका तंबूंत झाली. मेजर मालकम ह्याजबरोबर पेपर ह्या नांवाचा दुसरा एक साहेब होता, तो तेथेंच जवळ बसला होता. त्यांच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी चालल्या असतां, एक मोठी पावसाची सर आली, आणि त्या पेपर साहेबाच्या आंगावर एका पन्हळाच्या धारेप्रमाणें पाण्याची धार पडूं लागली. त्या वेळेपर्यंत शिंदा आणि त्याचे सरदार मोठा गंभीरपणा धरून तेथें सभ्यपणानें बसले होते. परंतु, त्या धारेखालीं त्या साहेबाची धांदल पाहून, त्या सर्वांस इतकें हंसूं आलें कीं, तो गंभीरपणा आणि सभ्यपणा एका क्षणांत नाहींसा होऊन, एकाद्या हलकट मुलांच्या मंडळीप्रमाणें ते सगळे दिसूं लागले. असें सर जान मालकम ह्यानें स्वतः लिहून ठेविलें आहे.

वऱ्हाडचा राजा आणि शिंदा ह्यांशीं ह्याप्रमाणें तह ठरविल्यानंतर, जनरल वेल्सली हा गोदावरी नदी उतरून दक्षिणेकडे आला. तेव्हां, पूर्वीच्या युद्धामध्यें मराठ्यांस जे कांहीं लहानसहान लोक आणि सरदार साह्य करीत होते, त्यांजविषयीं त्यास विचार करावयाचा होता. त्यांस त्यानें प्रथमतःच

असें कळविलें कीं, तुह्मी आपापलीं सैन्यें मोडून टाकून, जर स्वस्थपणें आपापल्या ठिकाणीं जाल, तर तुमच्या पूर्वींच्या सर्व कृत्यांची आह्मी क्षमा करूं. तें त्यांनीं ऐकिलें नाहीं. आणि ते पिरिंडा घाट आणि तुळजापूर ह्यांच्या मध्यें जमून कांहीं नवनव्या मसलती करूं लागले. तेव्हां, तारीख ४ फेब्रुवारी रोजीं, त्यांजवर हल्ला करण्यास जनरल वेल्सली हा आपल्या सैन्यासहवर्तमान निघाला. तो पिरिंड्याजवळ प्राप्त झाल्याचें वर्तमान त्या लोकांस कळतांच ते घाबरले, आणि आपले जीव घेऊन पळूं लागले. इंग्लिशांकडच्या लोकांनीं त्यांचा पाठलाग केला. तेव्हां ते केवळ पराभव पावले. त्यांच्या तोफा आणि सामानसुमान हीं विजयी लोकांच्या हातीं लागलीं. ह्या वेळीं इंग्लिशांकडचा सगळा एक मनुष्य मेला, आणि तो देखील लढाईंत मेला नाहीं, तर, दमून उरीं फुटून मेला, असें जनरल वेल्सली ह्यानें लिहिलें आहे.

हें कृत्य आटोपल्यावर, जनरल वेल्सली हा, तारीख २३ फेब्रुआरी रोजीं आपल्या हाताखालचें लष्कर जिकडील तिकडे पाठवून, पुण्यास आला. तेथें पेशव्यांच्या कारभाराविषयीं त्याचें आणि त्या दरबारच्या मुख्य कामदारांचें पुष्कळ बोलणें झालें. नंतर तो मुंबईस गेला. तेथें, तेथील सर्व इंग्लिशलोकांनीं त्याचा बहुमान केला. त्यांनीं एक मोठी सभा करून तिजमध्यें त्याला एक मानपत्र आणि ५०० रुपयांचें रुप्याचें ताट दिलें. त्यामध्यें त्याच्या शौर्याचें आणि त्याच्या पराक्रमाच्या योगानें इंग्लिश सरकारचें जें हित झालें होतें त्याचें वर्णन केलें होतें. आणखी त्यांत असें लिहिलें होतें कीं, मेजर जनरल वेल्सली हा जसा युद्धविद्येमध्यें प्रवीण आहे, तसा राज्यकारभारामध्येंही मोठा निष्णात आहे,

असें सर्वांच्या अनुभवास आलें आहे. आणि ती गोष्ट शब्दशः खरी होती. पुण्याच्या कामदारांनीं देखील त्याला एक पांच साहाशें रुपयांचें रुप्याचें सुंदर तबक ह्या प्रसंगीं बक्षीस दिलें. त्याप्रमाणेंच आसई येथील पराक्रमाबद्दल त्यास दाहा हजार रुपये किंमतीची एक तरवार बक्षीस दिली.

हें सगळें आटोपल्यावर, इ० स० १८०४ च्या एप्रिल महिन्यांत तो मुंबई येथें असतां यशवंतराव होळकराशीं युद्ध करण्याविषयीं गव्हरनर जनरलानें एक हुकूम कमांदर इंचीफ जनरल लेक ह्यास पाठवून, त्याची नकल मेजर जनरल वेल्सली ह्याजकडे रवाना केली. त्यांत असें लिहिलें होतें कीं जनरल लेक ह्याच्या हाताखालीं मेजर जनरल आर्थर वेल्सली ह्यानें लढाईचें काम पतकरून, होळकरावर इंग्लिशांची एकदम छाप बसे असें करावें. हा हुकूम हातीं येतांच, त्यानें मोहिमीवर जाण्याची सिद्धता केली. त्याच्या हाताखालीं जे लोक त्या प्रसंगाकरितां दिले होते, त्यांचे कपडे अगदीं फाटून गेले होते. कितीएकांस तर डगलीं मुळींच नव्हतीं. त्याविषयीं त्यानें सरकारांत लागलेंच लिहिलें; परंतु, तिकडून कपड्यांचा पुरवठा लवकर येणार नाहीं, असें त्याला वाटल्यावरून, त्यानें हुकुमाची वगैरे वाट न पाहतां, आपल्या सवडीप्रमाणें कांहीं तजवीज करून, पंधरा वीस दिवसांच्या आंत पांच हजार लोकांस सर्व कपडे दिले. विचार करून पाहिला असतां, ही गोष्ट मेजर जनरल वेल्सली ह्यास फार भूषणप्रद आहे, असें दिसून येईल. ही तजवीज जर तो न करिता, तर त्या पांच हजार लोकांस सगळा पावसाळा उघड्या आंगानें काढावा लागला असता.

होळकरावर मोहीम करण्याची सर्व तयारी मेजर जनरल

वेल्सली ह्यानें केली खरी; परंतु, ह्या लढाईमध्यें आपण स्वतः जाऊंनये, असा त्याचा निश्चय झाला होता. ह्याचीं कारणें दोन होतीं. त्यांतलें पहिलें हें कीं मागच्या लढाईमध्यें नेहमीं नेहमीं तंबूमध्यें राहिल्यामुळें तो अशक्त आणि कांहींसा दुखणाईत झाला होता. आणि दुसरें कारण असें होतें कीं, त्याच्या इतक्या परिश्रमांप्रमाणें आणि पराक्रमाप्रमाणें विलायतच्या सरकारानें त्याचा कांहींच मान केला नव्हता. ह्यांत हें दुसरें कारण विशेष बलवत्तर होतें. तरी, प्रथमतः त्यानें आपल्या ताब्यांतलें कांहीं सैन्य आपल्या स्वतःच्या हुकुमाखालीं दक्षिणेमध्यें ठेविलें; आणि कर्नल मरे ह्याजबरोबर कांहीं सैन्य देऊन, त्यास होळकराचीं माळव्यांतलीं ठाणीं घेण्यास पाठविलें. त्या सुमारास त्यानें त्यास एक पत्र लिहिलें. त्यांत असें आहे कीं, “आतां तुह्मांला मोठी शिकार करावयाची आहे. परंतु, तुमच्या श्रमांचें साफल्य, तुह्मी ज्या रीतीनें आपणांबरोबरच्या मराठ्यांशीं वागाल, त्या रीतीवर अवलंबून आहे. ह्याविषयीं माझें तुह्मांस एवढेंच सांगणें आहे कीं, तुह्मी त्यांशीं नेहमीं सलुख्यानें वागा; आणि त्यांस ममतेनें वागवून, त्यांस आपलेसे करून घ्या; ह्मणजे ते तुह्मांस उत्तम प्रकारें साह्य करितील. तथापि, ते मराठे आहेत, हें तुह्मीं विसरतां कामास नये. पूर्ण विश्वास ठेवण्यास पात्र असा त्यांत एक देखील सांपडावयाचा नाहीं. त्यांच्यांतल्या बहुतेक लोकांचा पत्रव्यवहार शत्रूच्या सैन्यांतील लोकांशीं असेल, असें वाटतें. तुह्मी त्यांजवर विश्वास ठेवूं नका; परंतु, आह्मी तुह्मांवर विश्वास ठेवीत नाहीं, असें त्यांस कधींही दिसूं देऊंनका. इतकें उघड करून हें मीं तुह्मांला सांगितलें, ह्याबद्दल तुमचे मनांत भलतेंच कांहीं येऊंनये. अशा रीती-

नेंच वागल्यावरून मला माझ्या कामांत यश येत गेलें, ह्मणून ही रीति मीं तुह्मांस कळविली आहे."

कर्नल मरे ह्यास प्रथम प्रथम चांगलेंसें यश आलें नाहीं. तें ऐकून मेजर जनरल वेल्सली ह्यास फार वाईट वाटलें. ह्या सुमारास, कांहीं राज्यप्रकरणाचा विचार करण्याकरितां गव्हरनर जनरलानें त्यास कलकत्त्यास बोलाविलें. तिकडे निघून जाण्याचे अगोदरच, ह्मणजे, इ० स० १८०४ च्या मे महिन्यामध्यें, त्यानें आपले कामाचा राजीनामा दिला. तो कमांदर इन्‌चीफ जनरल लेक ह्यानें मोठ्या नाखुषीनें कबूल केला. तो कलकत्त्यास जाण्याच्या आधीं श्रीरंगपट्टणास गेला. तेथें त्यास तेथील लोकांनीं एक मोठें मानपत्र दिलें. त्याचें तात्पर्य असें: "आह्मीं आपल्या सुखदायक कारकीर्दीमध्यें पांच वर्षें मोठ्या आनंदानें घालविलीं. आपण दूर मुलुखामध्यें लढाईंत गुंतलां होतां, तेव्हां देखील आपलें लक्ष आमच्या कल्याणाकडे होतें, हें आह्मांस ठाऊक आहे. परमेश्वरानें आपणांस त्या लढाईच्या संकटांतून पार पाडून येथवर सुरक्षितपणें आणिलें, ह्मणून आह्मी सर्व जातींचे लोक त्याचे आभार मानीत आहों, व मोठा उत्सव करीत आहों. सर्व जगाचा प्रभु आपणांवर निरंतर कृपा करो, आणि आपणांस निरंतर सुखलाभ होवो, अशी आमची फार फार इच्छा आहे. ती विश्वंभरानें पूर्ण करावी." हें झाल्यानंतर, जुलै महिन्यामध्यें तो कलकत्त्यास पोहोंचला. तेथें, पार्लमेंत सभेनें त्यास शाबासकी दिल्याचें पत्र आलें होतें, तें गव्हरनर जनरलानें त्यास दिलें.

नंतर त्यानें स्वदेशीं जाण्याची सर्व तयारी केली. इतक्यांत, शिंदा आणि भोंसला हे जे राजे तह करून घेऊन

स्वस्थ राहिले होते, ते होळकरास साह्य करण्यास पुनः उठणार असें भय उत्पन्न झालें. तेव्हां, अशा प्रसंगास मेजर जनरल वेल्सली ह्यावांचून दुसऱ्याच्यानें संकटाचें निवारण व्हावयाचें नाहीं, असें मनांत आणून, गव्हरनर जनरलानें मोठ्या आर्जवानें त्यास पुनः राहवून घेऊन, पहिले सर्व अधिकार देऊन, श्रीरंगपट्टणच्या त्याच्या पहिल्या कामावर त्यास पाठविलें. तो तेथें येऊन काम पाहूं लागल्यावर लवकरच होळकराचा पराभव झाला, आणि त्यानें इंग्लिशांच्या ह्मणण्याप्रमाणें तह कबूल केला. आणखी, जे दोन राजे पुनः उठणार असें भय पडलें होतें, तेंही दूर झालें. तेव्हां, स्वदेशीं जाण्यास गलबतांत बसण्याकरितां तो इ० स० १८०५ च्या फेब्रुआरी महिन्यांत मद्रासेस आला. तेथें असतां, त्यास इंग्लंदच्या राजाकडून *"नैत आफ धि बाथ" ही मोठी पदवी मिळाल्याची सनद पोहोंचली. तेणेंकरून त्यास फार संतोष झाला. नंतर तो इ० स० १८०५ च्या मार्च महिन्यामध्यें हिंदुस्थानांतून निघाला, तो इंग्लंदामध्यें सप्तंबर महिन्यांत जाऊन पोहोंचला. नंतर युरोप खंडामध्यें त्याचे हातून मोठमोठीं कृत्यें घडून त्याचें नांव इतिहासामध्यें अजरामर झालें. त्याचें कथन पुढच्या भागीं करूं.

---

## भाग तिसरा.

सर आर्थर वेल्सली इंग्लंदांत परत आला त्या वेळीं नापोलियन बोनापार्तानें सगळें युरोपखंड आपल्या पराक्रमानें

---

* ह्या पदवीवरून, अर्थर वेल्सली ह्याच्या नांवाच्या मागें 'सर' हा किताब लागूं लागला.

दणाणवून सोडिलें होतें, व त्यांतील प्रत्येक राष्ट्र स्वसंरक्षणाच्या विचारांत अगदीं गढून गेलें होतें. नापोलियन बोनापार्तीचें प्राबल्य मोडून टाकण्याकरितां युरोपांतले कितीएक देश एक झाले होते, त्यांमध्यें इंग्लंद होतें. आणि हिंदुस्थानांतल्या महत्कृत्यांवरून त्या दरबारामध्यें सर आर्थर वेल्सली ह्याच्या शौर्याची आणि धैर्याची मोठी ख्यातिही झाली होती; तरी, फ्रेंच लोकांवर पाठवावयाच्या सैन्यामध्यें प्रथम कांहीं दिवस त्याची योजना झाली नाहीं. ह्यास्तव तो पार्लमेंताचा सभासद झाला; व पुढें कांहीं वेळपर्यंत त्यानें कांहीं दुसरीं सरकारी कामें पतकरिलीं. इकडे नापोलियन बोनापार्तानें ताक्सेल पासून जिनोआ पर्यंत युरोपांतलीं सगळीं बंदरें व्यापून टाकून, ऱ्हैन नदीच्या दोन्हीं बाजूंवर युद्ध करण्याकरितां सैन्य सज्ज करून ठेविलें होतें. त्याचा पराभव करण्याकरितां आस्त्रिआ आणि रुशिआ ह्या देशांतलीं सैन्यें कडीकोट तयारी करून निघालीं. आणि इंग्लंदचें सैन्य रवाना व्हावें, अशी त्यांनीं सूचना पाठविली. तेव्हां जें इंग्लंदांतलें सैन्य निघालें, त्यामध्यें एका भागाचें आधिपत्य सर आर्थर वेल्सली ह्यास मिळालें. त्या लोकांसहवर्तमान तो ब्रेमेन येथें येऊन उतरला, आणि पुढें जाऊं लागला. परंतु, दान्यूब नदीवर नापोलियन बोनापार्तानें असा उत्तम बंदोबस्त ठेविला होता कीं, तिकडे कांहीं केल्या प्रवेश होईना. तेव्हां, ह्मणजे इ० स० १८०५ च्या अखेरीस, कांहीं एक विशेष गोष्ट न करितां, सर आर्थर वेल्सली हा सैन्यासहवर्तमान इंग्लंदास परत आला.

ह्या वेळीं इंग्लंद देशाच्या सरकारास फार कठीण प्रसंग प्राप्त झाला होता, तो असाः—नापोलियन बोनापार्त घडोघडीं चारी दिशांनीं आपलें पाऊल पुढें पुढें टाकित चालला होता,

तो आपणावर केव्हां येईल कोण जाणे, हें जें भय इतर राष्ट्रांस पडलें होतें, तें ह्यास होतेंच ; आणखी, तिलसित येथें रुशिआ आणि फ्रान्स ह्या दोन देशांच्या बादशाहांचा जो तह झाला होता, त्यामध्यें त्यांनीं गुप्तपणें असें ठरविलें होतें कीं, स्पेन, पोर्तुगाल, देन्मार्क, इत्यादि ठिकाणचे राजे आपणांस अनुकूल झाले ह्मणजे मोठ्या सैन्यानिशीं इंग्लंदावर हल्ला करावा; हा गुप्त विचार इंग्लंदच्या राजास आणि त्याच्या प्रधान मंडळीस समजला होता, आणि आपल्या देशावर नापोलियनाचा फार डोळा आहे, असें त्यांस माहीत होतें; तेणेंकरून त्यांस दुप्पट काळजी उत्पन्न झाली. परंतु, नुसता विचार करीत बसणें उपयोगीं नाहीं, असें मनांत आणून त्यांनीं लागलेंच आपलें सैन्य सिद्ध केलें.

आपल्या ताब्यामध्यें इतकीं बंदरें आहेत, हें देन्मार्कच्या व इतर देशच्या राजांच्या डोळ्यांत सलत आहे, हें इंग्लंदच्या राजास ठाऊक होतें. आणि, एवढ्या बलाढ्य बादशाहांनीं भीड घातल्यावर, देन्मार्कचा राजा त्यांचें ह्मणणें नाकबूल करावयाचा नाहीं, हें त्यास खचीत ठाऊक होतें. ह्याकरितां आधीं त्या राजाचा बंदोबस्त केला पाहिजे, असें त्यानें मनांत आणिलें. तथापि, एकदम त्यावर स्वारी करणें हें त्यास योग्य वाटलें नाहीं. ह्मणून, आधीं सामोपचाराच्या रीतीनें त्यास वळविण्याकरितां त्यानें जाक्सन ह्या नांवाचा एक गृहस्थ त्याजकडे पाठविला. तेव्हां तो कील येथें होता. तेथें राजाची आणि जाक्सन ह्याची भेट झाली. त्या राजास इंग्लंदच्या राजाचा एवढाच निरोप होता कीं, युरोपखंडांत जी हल्लीं गडबड झाली आहे, ती नाहींशी होऊन चोहींकडे शांतता होई पर्यंत तुह्मीं आपलें आरमार आमच्या हवालीं

करावें; हें आरमार आह्मी ही गडबड मोडतांच तुमचें तुह्मांस जशाचें तसें परत देऊं. हें ह्मणणें त्या राजानें मान्य केलें नाहीं. आणि ह्या वकीलाच्या मागोमाग, कोपेनहेगन शहरावर हल्ला करण्याकरितां आलेलें सैन्य सिद्ध आहे, असें त्यास कळलें. तेव्हां तो राजा, मोठ्या निश्चयानें, आपल्या राजधानीची वाट ती आपली वाट, असें ह्मणून, तेथून निघून कोपेनहेगन येथें जाऊन राहिला. ह्यावेळची एक गोष्ट फार लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, देन्मार्कचा राजा कोपेनहेगनास ज्या मार्गानें गेला, त्या मार्गावर इंग्लिश सरकारचा सक्त पाहारा होता; व तो जेव्हां गेला, तेव्हां हा देन्मार्कचा राजा चालला आहे, असें त्या पाहऱ्यावरच्या सैन्यास समजलेंही होतें; परंतु, त्यांनीं त्यास तसेंच जाऊं दिलें; मध्येंच धरून अडकवून ठेविलें नाहीं. असें आचरण करण्यास मनुष्याचे ठायीं बरेंच थोरपण असावें लागतें. तो राजा कोपनहेगन येथें जाऊन पोहोंचला न पोहोंचला इतक्यांत इंग्लिशांचें सैन्य त्या शहराच्या भिंतीच्या बाहेरच्या बाजूशीं जाऊन थडकलें. बाहेरचे लोक वेढा घालण्याची आणि आंतले लोक स्वसंरक्षणाची तयारी मोठ्या आवेशानें करूं लागले. इकडे इंग्लिशांच्या लष्करांतल्या मुख्य सरदारानें सर्वांस जाहीर होण्याकरितां असा जाहीरनामा प्रसिद्ध केला कीं, देन्मार्काचा नाश करून टाकावा, अथवा तो देश जिंकून घ्यावा, असा आमचा मुळींच हेतु नाहीं; तर जिकडे तिकडे शांतता होई तोंपावेतों ह्या देशाच्या राजानें आपलें सगळें आरमार आमच्या सरकारच्या हवालीं करावें, एवढाच कायतो हल्ल्याचा हेतु आहे.

ह्या मोहिमीचें मुख्य आधिपत्य लार्ड क्याथकार्त ह्या

सरदाराकडे होतें. त्यानें कोपनहेगनास आपल्या सैन्याचा वेढा मोठ्या बंदोबस्तानें घातला. तरी देन्स लोकांनीं कीं-ओज येथें बरेंच सैन्य जमवून, इंग्लिश सैन्यास उपद्रव देण्याचा विचार मांडिला. त्याच्या निवारणास इंग्लिश सरकारानें बरोबर कांहीं सैन्य देऊन, सर आर्थर वेल्सली ह्यास पाठविलें. हें काम ह्या पराक्रमी पुरुषानें फार उत्तम रीतीनें बजाविलें. ह्या प्रसंगीं तेथें देन्स लोक चांगल्या तयारीनें राहिले होते; व इंग्लिश सैन्यास मागें हटविण्यास त्यांनीं आपली पराकाष्ठा करून पाहिली. परंतु सर आर्थर वेल्सली ह्यानें त्यांचें कांहीं एक चालूं दिलें नाहीं. त्यांजवर एकदम चालून जाऊन त्यानें त्यांचा पराभव करून टाकिला, त्यांस पळायास लाविलें, त्यांच्यांतले १५०० लोक धरून बंदीवान केले, आणि त्यांजपासून त्यांच्या १४ तोफा हिसकावून घेतल्या. ह्या कृत्यावरून इंग्लंदामध्यें त्याची पुष्कळ कीर्ति झाली, आणि पार्लमेंत सभेनें त्यास मोठी शाबासकी दिली.

तिकडे कोपनहेगन ह्यास वेढा पडून, तें घेण्याचें काम मोठ्या निकरानें चाललें होतें. इंग्लिश सैन्याची तयारी फार चांगली होती; आणि त्यांच्या ज्या तोफा येऊन पोहोंचल्यां होत्या, त्या चांगल्या माऱ्यावर ठेवावयास सांपडल्या होत्या. वेढा घालणारे लोकांस शहर काबीज करण्याविषयीं जसा आवेश उत्पन्न झाला होता, तसें आपल्या शहराचें रक्षण करण्याविषयीं आंतल्या लोकांस मोठें धैर्य आलें होतें. ते आपलीं घरें दारें मोठ्या बंदोबस्तानें ठेवून, वेढा घालणाऱ्यांस मागें हटविण्याच्या कामीं एकसारखे झटत होते. आंतले लोक सामोपचारानें आपलें ऐकत नाहींत असें खचीत समजल्यावर, तारीख २ माहे सप्तेंबर सन १८०७ इ० रोजीं

इंग्लिश सैन्याच्या सरदारानें त्या शहरावर तोफांच्या गोळ्यांचा भडिमार चालविला. त्या गोळ्यांच्या योगानें त्या शहरामध्यें जागोजाग घरांस आगी लागत; त्या विझविण्यास लोक पाणी घेऊन अतितत्पर असत. परंतु घरें जाळणाऱ्यांपुढें घरें विझविणारांचें किती चालणार! पाणी वाहतां वाहतां लोक अगदीं थकून गेले; एकामागून एक अशीं दुसरीं अनेक घरें पेटत चाललीं. आळ्यांच्या आळ्या जमीनदोस्त झाल्या; शेंकडों माणसें उघडीं पडून आक्रोश करूं लागलीं; अशी स्थिति तीन दिवस चालली. तितक्या मुदतीमध्यें सुमारें अठराशें मोठमोठीं घरें धुळीस मिळून अजमासें पंधराशें मनुष्यें प्राणांस मुकलीं. तेव्हां आंतल्या बाकी राहिलेल्या लोकांचें धैर्य अगदीं खचून गेलें. त्यांचा मुख्य सरदार जनरल पीमान ह्मणून होता, त्यास राजानें ह्या युद्धाच्या संबंधाचा सर्व अधिकार दिला होता, तो देखील घाबरून गेला. तेव्हां सप्तेंबरच्या पांचव्या तारखेस त्यानें वेढा घालणाऱ्या इंग्लिश सैन्याच्या सरदाराशीं तहाचें बोलणें लाविलें. परंतु इंग्लिश सरकारानें देन्मार्कचे राजाशीं त्याच्या ह्मणण्याप्रमाणें तह करावा, असा वेळ राहिला नव्हता. कारण, आपलें श्रेष्ठत्व प्रत्येक पक्षानें आपल्या बाहुबलाच्या योगानें स्थापित करून घ्यावें, असें त्यानें कोपनहेगन शहरास जातेवेळींच इंग्लिशांच्या सेनापतीस प्रदर्शित केलें होतें. त्याप्रमाणें इंग्लिश सरकाराचें श्रेष्ठत्व स्थापित झालें. तव्हां तें सरकार त्या राजापाशीं जें जें मागूं लागलें, तें तें त्यानें देण्याचें कबूल केलें. नंतर युद्ध बंद होऊन, इंग्लिश सरकारचे लोक कोपनहेगन शहरामध्यें गेले. तेथें जिकडे तिकडे आगी लागल्या आहेत, दांडगावा चालला आहे, आणि लोक शोकसमुद्रांत बुडाले

आहेत, असें पाहून त्यांस फार वाईट वाटलें आणि त्यांनीं त्याच्या बंदोबस्ताकरितां कंबर बांधिली. कांहीं देन्स लोक ह्या कामास पूर्वींच लागले होते; आणि त्यांत ही इंग्लिश लोकांचीं मदत त्यांस मिळाली, तेणेंकरून शहरामध्यें लवकरच जिकडे तिकडे स्वस्थता झाली. एक नामांकित ग्रंथकार ह्याविषयीं असें ह्मणतो कीं, ज्या कामास शत्रु आणि मित्र हे दोनही प्रकारचे लोक मनापासून झटूं लागले, तें काम लवकर व्हावें, हें उघड आहे. कोपनहेगन येथें सर आर्थर वेल्सली ह्याचें आधीं युद्धकौशल्य, आणि मग राज्यव्यवहारज्ञान अशीं दोन्ही उत्तम प्रकारें दिसून आलीं. एम थायर्स ह्या नांवाचा एक नामांकित फ्रेंच ग्रंथकार होऊन गेला आहे. त्यानें असें ह्मटलें आहे कीं, "सर आर्थर वेल्सली ह्यानें हिंदुस्थानामध्यें मोठमोठे पराक्रम केले असतील खरे; परंतु त्याचें खरें शौर्य आणि खरें शाहाणपण हीं कोपनहेगन येथें जशीं दिसून आलीं, तशीं दुसरे कोठेंही दिसून आलीं नसतील." कोपनहेगन शहर अगदीं पादाक्रांत झाल्यावर देन्मार्कच्या सरकारानें, पूर्वींच्या मागण्याप्रमाणें, आपलें सगळें आरमार इंग्लिशांच्या स्वाधीन केलें. तें घेऊन, इंग्लिशांचे सरदार, मोठा जयोत्सव करीत इंग्लंदास परत आले.

ह्या मोहिमीमध्यें इंग्लिशांस असा उत्तम जय प्राप्त झाला, हा त्यांचें वजन वाढण्यास फार उपयोगीं पडला. इंग्लंद देशाचें सैन्यबल फार चांगलें आहे, असें युरोपांतले सर्व राजे मानूं लागले. तरी, ही स्वारी अगदीं अन्यायाची होती, आणि हिचें कांहीं कारण नव्हतें, असा त्यांनीं पुष्कळ गवगवा केला. स्वतः नापोलियन बोनापार्त ह्याविषयीं असें ह्मणाला कीं, "रक्तपात आणि तरवार ह्यांच्या जोरानें इंग्लिशांनीं कोपनहेगन घेतलें."

नापोलियन बोनापार्ताचें प्राबल्य वाढत चाललें होतें, तें नाहींसें करण्याचे कामीं, आपणास इतर राजांचें साह्य मिळण्याची फारशी आशा नाहीं, असें इंग्लंदच्या सरकारास वाटलें, आणि त्याप्रमाणें, त्याशीं एकाकीं युद्ध करण्याची सिद्धता त्यांनीं मोठ्या झपाट्यानें चालविली. तिकडे स्पेन आणि पोर्तुगाल हे देश नापोलियन बोनापार्तानें व्यापून टाकिले होते आणि त्याचें सैन्य दिवसानुदिवस मोठें मोठें होत होतें. त्यानें आपला भाऊ जोसेफ ह्यास स्पेनच्या गादीवर बसविलें होतें; आणि त्या दोन्ही देशांतले लोक महत्संकटांत बुडाले होते. अशा प्रसंगीं त्या देशांमध्यें आपलें सैन्य पाठविण्याचा निश्चय इंग्लिश सरकारानें केला; आणि त्याचें आधिपत्य त्यांनीं सर आर्थर वेल्सली ह्यास दिलें. त्याचे हाताखालीं १२००० लोक दिले होते; आणखी शिवाय एक दोन सरदार त्याचे साह्यास जावे, असा हुकूम झाला होता. ह्या मोहिमीवर सर आर्थर वेल्सली ह्याची नेमणूक झाली होती, आणि ती सर्व लोकांस आवडली होती, हें खरें; परंतु, ती योजना कायमची नव्हती. सर हारी बरार्द ह्यानांवाचा कोणीएक सरदार, ह्यापेक्षां पुष्कळ अधिक मुदतीचा नौकर होता; तो रिकामा होतांच त्यास सर्व सैन्याचें आधिपत्य सर आर्थर वेल्सली ह्यानें द्यावें, असें ठरलें होतें; आणि त्याहीपेक्षां सर ह्यू दालरिंपल हा सरदार पुष्कळ अधिक हकांचा होता, तो मोकळा होतांच, सैन्याचें स्वामित्व त्यानें बरार्द ह्याजपासून आपणाकडे घ्यावें, असा हुकूम झाला होता. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं अशी स्थिति असणें हें फार गैर सोईचें आहे; आणि त्यापासून कधीं कधीं मोठमोठाले घोंटाळे होण्याचाही संभव आहे; ही गोष्ट अगदीं उघड

असतां, इंग्लंदच्या सरकारानें इजकडे कसें लक्ष पुरविलें नाहीं, हें कळत नाहीं.

सर आर्थर वेल्सली हा आपलें सैन्य घेऊन पोर्तुगाल देशाकडे जावयास जलमार्गानें निघाला. तो प्रथम तारीख २६ माहे जुलै सन १८०८ रोजीं ओपोर्तो येथें पोहोंचला; आणि तेथून, तिसाव्या तारखेस मांदेगो येथें गेला. त्यानें पोर्तुगाल देशच्या सर्व लोकांची दुर्दशा झालेली पाहिली, तेव्हां त्याला फार वाईट वाटलें. आणि, आपला सैन्यासहवर्तमान येण्याचा हेतु, त्यानें त्यांस जाहीरनाम्याच्या द्वारें स्पष्टपणें प्रसिद्ध केला. तो त्यांस फार चांगला वाटला असावा, ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु, फ्रेंच लोकांस ते इतके भीत असत कीं, आपला कल इंग्लिश सरदाराकडे आहे, असें प्रदर्शित करण्यास देखील ते थरथरां कांपत असत.

तरी, सर आर्थर वेल्सली ह्यानें पोर्तुगीज लोकांस अभय देऊन, आणि आपला हेतु स्पष्ट कळवून, त्यांचें थोडेंसें साह्य मिळविलें. नापोलियन बोनापार्ताचा सरदार जूनोत हा लिस्बोन येथें मोठ्या तयारीनें राहिला होता. कारण, सर आर्थर वेल्सली आल्याचें वर्तमान त्यास आधींच कळलें होतें. त्यावर एकदम हल्ला करण्यापेक्षां, त्याचीं जीं कांहीं बंदोबस्ताचीं ठिकाणें आहेत, त्यांजवर आधीं हल्ला करावा, हें सर आर्थर वेल्सली ह्यास बरें वाटलें. ह्मणून त्यानें आधीं रालिका ह्या नांवाच्या स्थलावर चाल केली. तेथें फ्रेंच लोकांचें सैन्य बरेंच होतें; व त्यांस राहण्यास जागाही चांगली होती. परंतु, सर आर्थर वेल्सली ह्यानें जेव्हां त्यांजवर हल्ला केला, तेव्हां ते घाबरून गेले, आणि पुढें काय करावें, हें त्यांस सुचेनासें झालें. तेथें उभय पक्षांची च-

कामक बरीच वेळ झडली. तींत फ्रेंच लोक केवळ पराभव पावले, आणि सर आर्थर वेल्सली ह्यास यश आलें. ह्या प्रसंगीं इंग्लिशांकडील मेले आणि जखमी झाले ह्यांची एकंदर गणती पांचशें पर्यंत सांगितली आहे. फ्रेंच लोकांचे ६०० जवान रणांगणीं पतन पावले. आणि त्यांच्या तीन तोफा इंग्लिशांनीं घेतल्या.

रालिका येथें फ्रेंचांचा पराभव करून इंग्लिश सरदार स्वस्थ बसले नाहींत. ते त्यांचा पाठलाग करीत त्यांच्या मागें चालले. फ्रेंच लोकांचा पळण्याचा सगळा झोंक लिसबनशहराकडे होता. त्यांस तिकडे जाऊं देऊं नये, अशी योजना करण्याच्या कामामध्यें सर आर्थर वेल्सली हा अगदीं गढून गेला असतां, सर हारी बरार्द तेथें प्राप्त झाला; आणि त्यानें सैन्याचें सर्व आधिपत्य आपणाकडे घेतलें. तेव्हां त्याचे विचार मनचे मनांत राहिले. आणखी सर आर्थर वेल्सली ह्यानें जे कांहीं बेत करून ठेविले होते, ते त्यानें सगळे फिरवून टाकिले. हें कृत्य त्यानें मत्सरबुद्धीनें केलें किंवा कांहीं दुसरा विचार मनांत आणून केलें, हें बरोबर समजत नाहीं. परंतु, सर आर्थर वेल्सलीच्या विचाराप्रमाणें सव कामें चालून जर सैन्याची व्यवस्था झाली असती, तर फ्रेंच लोकांचा पराभव होण्यास अगदीं देखील उशीर लागताना, असें पुष्कळ विचारी ग्रंथकारांचें ह्मणणें आहे.

सर आर्थर वेल्सली हा सर हारी बरार्द ह्याच्या हुकुमाप्रमाणें वागूं लागला. त्याचें जरी फारसें चालेना तरी, त्याची मसलत फार युक्तीची आहे, असें त्याच्या वरिष्ठास वाटत असे. रालिका येथील लढाई आटोपल्यावर, इंग्लिश

मागें आणि फ्रेंच पुढें असें चाललेंच होतें. इंग्लिश मोठें सैन्य घेऊन आपणांवर येत आहेत, असें समजून, फ्रेंचांचा मुख्य सरदार ज़ुनोत हा आपलें लष्कर एकत्र करून मोठ्या तयारीनें राहिला होता. एकमेकांचे हेर एकमेकांकडील बातम्या जाऊन सांगत होते; आणि तीं दोन्हीं सैन्यें एकमे- कांस भीत आणि एकमेकांवर हल्ला करण्याची चांगली संधी पाहात मोठ्या सावधगिरीनें फिरत होतीं. असें होतां होतां, तीं दोन्ही सैन्यें विमीरा नांवाच्या खेड्या जवळ प्राप्त झालीं. तेथें, आगस्त महिन्याच्या २१ व्या तारखेस फ्रेंच लोकांच्या सैन्याच्या एका टोळीनें इंग्लिश सैन्यावर हल्ला केला. त्यासरसे इंग्लिश शिपाई पुढें सरसावले. उभय- पक्षांची झटापट होतां होतां, प्रथमतः इंग्लिश सैन्याचा प- राभव होतो कीं काय, असें दिसूं लागलें. परंतु, फ्रेंचांस किंचित् आंगावर घेतल्यासारखें करून, त्यांनीं त्यांजवर जेव्हां एकदम मोठ्या निकरानें हल्ला केला, तेव्हां ते केवळ पराभव पावून पळत सुटले. हें युद्ध फार मोठें झालें. हें इतिहासामध्यें प्रसिद्ध आहे. ह्या प्रसंगीं फ्रेंच लोक मोठ्या शौर्यानें लढले, असें ह्मणतात. ह्या समरामध्यें फ्रेंचांकडचे दोन सहस्र लोक रणांगणीं पतन पावले; ४०० असामी इंग्लिशांनीं पाडाव करून नेले; आणखी सव्वीस तोफा व पुष्कळ दारूगोळा त्यांचे हातीं लागला. इंग्लिशांकडचे मेले आणि जखमी झाले मिळून एकंदर लोकांची गणती आठशें भरली. ह्या जयाच्या योगानें इंग्लिश सैन्याच्या शौर्याची युरोपखंडामध्यें मोठी वाहवा झाली; आणि फ्रेंच लोकांस त्यांचा मोठा दरारा बसला.

विमीरा येथील जे फ्रेंच लोक पळत सुटले, त्यांच्या पा-

ठोपाठ आपलें सैन्य पाठवून, त्यांचा पुरा पराभव आणि आपला पुरता जय हे चांगले स्थापित करावे, असें आपलें मत सर आर्थर वेल्सली ह्यानें सर हारी बरार्द ह्यास मोठ्या अगत्यानें, आग्रहानें, आणि केवळ स्वदेशहितबुद्धीनें कळविलें; परंतु त्यास तें रूचलें नाहीं. सर हारी बरार्द हा चांगल्या मनाचा, शूर, आणि विचारी पुरूष होता; परंतु त्याचें मत असें होतें कीं, एका आठवड्यामध्यें एक लढाई जिंकली ह्मणजे बस आहे; आणि त्याला आणखी असें वाटे कीं, एका लढाईमध्यें आपलें सैन्य दमलें असतां, लागलीच दुसरी लढाई आरंभणें हें अगदीं अप्रशस्त आहे. हें ह्या पुरूषाचें ह्मणणें खोटें नव्हतें. तरी, शत्रूचा एका ठिकाणीं पराभव करून त्यांस पळायास लाविल्यावर जर लागलाच त्यांचा पाठलाग केला, तर त्यांस पूर्णपणें जिंकण्यास फार श्रम पडत नाहींत, आणि असा प्रसंग फार थोडा येतो, असें जें सर आर्थर वेल्सली ह्याचें ह्मणणें होतें, तेंही खरें होतें. परंतु, तें ह्या प्रसंगीं चाललें नाहीं. सर हारी बरार्द ह्याचें ह्मणणें खरें झालें; आणि सर्व इंग्लिश सैन्य जागच्याजागीं छावणी करून राहिलें. अशी सोन्यासारखी संधी फुकट गेली, असें पाहून सर आर्थर वेल्सली ह्यास फार वाईट वाटलें. परंतु, पराधीनतेमुळें त्यास आपला असंतोष बाहेर प्रदर्शित करितां आला नाहीं. आणि जूनोत हा तारेसव्हेद्रासच्या कठीण आडवाटेनें राजधानीकडे निघून जात असल्याचें वर्तमान त्यास समजलें. तेव्हां तर त्यास अतिशयित वाईट वाटलें. परंतु, आपली स्थिति मनांत आणून, तोंडाबाहेर एक अक्षरही न काढितां, आपण जसे काय आनंदांत आहा, असें प्रदर्शित करून, त्यानें आपल्या हाताखाल-

च्या अमलदारांस विनोदानें ह्मटलें, "मित्रहो, आतां आपणांला कांहीं करावयाचें राहिलें नाहीं; चला आपण बदकांच्या शिकारीस जाऊं."

हें इतकें होत होतें इतक्यांत, सर ह्यू दालरिंपल हा तेथें आला, आणि त्यानें सर हारी बरार्द ह्याजपासून सर्व सैन्याचें आधिपत्य घेतलें. हें सगळें कृत्य, मागें सांगितलेली लढाई झाल्यापासून तीस तासांच्या आंत झालें. सर ह्यू दालरिंपल हा सरदार चांगला विचारी आणि मोठ्या धीराचा होता. त्यानें आधीं, पुढें कसें काय करावयाचें ह्याविषयीं सर आर्थर वेल्सली आणि सर हारी बरार्द ह्यांचे अभिप्राय घेतले. आणि, जिकडे जूनोत सैन्यासहवर्तमान गेला होता, तिकडे त्याचे मागोमाग जावयाचें, असा त्यानें निश्चय केला त्याप्रमाणें सगळी सिद्धता झाली. आणि त्याविषयींचे हुकूमही सर्व सरदारांस मिळाले. इतक्यांत, जनरल केलरमन ह्या नांवाचा कोणी फ्रेंच सरदार, आह्मी पोर्तुगालदेशांतून निघून जाण्यास कबूल आहों, असा जूनोत ह्याचा निरोप घेऊन आपणांकडे येत आहे, असें वर्तमान त्यांस समजलें, तेव्हां त्या स्वारीचा बेत तितकाच रहित झाला.

इंग्लिश सैन्यांतले सरदार आणि जनरल केलरमन ह्यांची मुलाखत सिंत्रा* येथें झाली. सलामसुलाम झाल्यावर, सर्वजण आपापल्या जाग्यांवर बसले. तहाचें बोलणें सुरू झालें. त्यांत एक चमत्कारिक गोष्ट घडून आली. ती अशी कीं, आपली भाषा केलरमन ह्यास समजत नाहीं, अशा भरंवशानें, इंग्लिश सरदार आपसांत कांहीं कुजबुजूं लागले. तें त्या

---

* हें ठिकाण पोर्तुगाल देशाच्या अगदीं पश्चिम किनाऱ्यावर लिस्बनच्या कांहींसें उत्तरेस आहे.

फ्रेंच सरदारानें लक्षपूर्वक ऐकिलें, आणि त्यांस इंग्लिश भाषा चांगली येत असल्यामुळें, त्यांच्या बोलण्यावरून त्यास असें स्पष्ट दिसून आलें कीं, सर आर्थर वेल्सली ह्याच्या ज्या युक्तीच्या गोष्टीं होत्या, त्या खरोखर फार चांगल्या आणि कार्यसिद्धीस जाण्यासारख्या असतां, त्या इतरांच्या मनांत भरल्या नव्हत्या, आणि त्यांच्यामध्यें पुष्कळ मतभेद होता. ही इंग्लिशांच्या सरदारांतील फुटीची गोष्ट त्यास फार बरी वाटली. आणि तेवढीवरून त्यानें आपल्या बोलण्याचा रोंख फिरवून, आपल्या पक्षाची किंचित् चढती कळा प्रदर्शित केली. त्यानें प्रथम असें बोलणें लाविलें कीं, जे फ्रेंच लोक हल्लीं पोर्तुगाल देशामध्यें आहेत, त्यांस तुह्मीं पाडाव केलेले लोक समजूं नये, तर त्यांस त्यांच्या हत्यारांसुद्धां व सामानसुमानासुद्धां सुरक्षितपणें समुद्रांतून फ्रान्स देशांत पाठवावें. त्याचें दुसरें ह्मणणें असें होतें कीं, आमच्या सैन्यास साह्य करण्यास जें दुसऱ्या कितीएक देशांतलें सैन्य आलें आहे, त्यास कोणत्याही प्रकारचा उपद्रव होऊंनये; आणि त्याची इच्छा असल्यास त्यास स्वस्थपणें स्वदेशीं जाऊं द्यावें. आणखी त्याचें तिसरें ह्मणणें असें होतें कीं, रुशिआचें आरमार जें लिसबनच्या बंदरांत येऊन राहिलें आहे, तें तसेंच तेथें स्वस्थ राहूं द्यावें.

ह्यांतलीं पहिलीं दोन कलमें इंग्लिश सरदारांस सर्वानुमतें मान्य झालीं. परंतु, तिसऱ्या, ह्मणजे रुशिआच्या आरमाराविषयींच्या कलमाविषयीं सर आर्थर वेल्सली ह्याचें मत अगदीं उलटें पडलें. तो तें ह्मणणें अगदीं कबूल करीना. तेव्हां, तें प्रकरण सर चार्लस कातन ह्याजकडे पाठवावें आणि त्याचें जसें मत पडेल तसें करावें असें ठरलें. त्याप्रमाणें सर्व तजवीज झाली. सर चार्लस कातन ह्याचें मत सर

आर्थर वेल्सली ह्याच्या मताप्रमाणें पडलें. तेव्हां, अर्थातच फ्रेंच लोकांनीं त्या रुशिआच्या आरमाराच्या बचावाचा नाद सोडिला, आणि पहिल्या ठरलेल्या दोन कलमां अन्वयें आपल्या संरक्षणाच्या तजविजीस ते लागले.

फ्रेंच लोक पोर्तुगाल देश व्यापून राहिले असतां, वर सांगितलेल्या करारांप्रमाणें, ते विजयी इंग्लिश सैन्याच्या स्वाधीन झाले. तेव्हां, त्या सैन्यांतले लोक, एकामागून एक असे दोन जय प्राप्त झाल्यामुळें, गर्वानें इतके फुगून गेले होते कीं, आपण करावें काय आणि न करावें काय, ह्याचें भान त्यांस राहिलें नाहीं. त्यांनीं फ्रेंच सैन्यांतील लोकांस पुष्कळ त्रास दिला, आणि त्यांच्या सावकारांच्या पेढ्या लुटून त्यांस अगदीं निर्धन करून सोडिलें. हा खरोखर मोठा विश्वासघात झाला. वर सांगितलेला तह ठरल्यावर, अशा गोष्टी न होऊं देण्याविषयीं बंदोबस्त ठेवणें इंग्लिश सरदारांचें काम होतें. तें त्यांजकडून झालें नाहीं. हा बोभाट सर्व युरोपखंडभर झाला. आणि ह्या अपकीर्तीबद्दल इंग्लंदांतील सर्व लोकांस फार वाईट वाटलें. ही गोष्ट पार्लमेंतामध्यें निघाली तेव्हां तेथें तिजविषयीं पुष्कळ वादविवाद झाला. शेवटीं, ह्या कृत्याचा दोष कोणाकडे आहे, हें ठरविण्याकरितां एक प्रतिष्ठित विद्वान् लोकांची सभा नेमली. तिनें सर्व प्रकारची चौकशी करून पाहिली. तिजवरून, त्या कृत्याचा सर्व दोष सर हारी बरार्द आणि सर ह्यू दालरिंपल ह्या सरदारांकडे होता, असें सिद्ध झालें. त्यावरून, सरकारानें त्यांचा फार निषेध केला; आणि त्यांस पुनः अशा मोठ्या मोहिमीचें स्वामित्व देऊंनये, असें ठरविलें. त्या चौकशीमध्यें सर आर्थर वेल्सली ह्याजकडे तिळभर देखील दोष आला नाहीं,

आणि त्याच्या वर्तणुकेची उलटी मोठी वाहवा झाली. तेव्हां पार्लमेंत सभेनें व राजानें त्यास मोठी शाबासकी देऊन त्याचा बहुमान केला.

ह्या वर सांगितलेल्या चौकशीकरितां इंग्लिश सैन्याचे बहुतेक मुख्य मुख्य सरदार पोर्तुगालाहून इंग्लंदास गेले होते; आणि त्या देशामध्यें व्यवस्था नीट राखण्यास व नापोलियन बोनापार्ताची हालचाल लक्षपूर्वक पाहण्यास सर आर्थर वेल्सली तेथें राहिला होता. त्यास इंग्लंदच्या सरकारानें असा हुकूम पाठविला कीं, तुह्मीं पोर्तुगाल देशांतल्या सैन्यापैकीं २१००० लोक आपणांबरोबर घेऊन, ते करूना येथें सर दाव्हिद बेर्द ह्याच्या हाताखालीं देऊन, जे ७००० लोक पाठविले आहेत, त्यांशीं मिळवून, पोर्तुगालच्या स्वदेशाभिमानी लोकांसहवर्तमान, स्पेन देशामध्यें फ्रेंच सैन्यावर हल्ला करावा, आणि त्या लोकांस कोंडीत कोंडीत ईशान्येच्या कोंपऱ्याकडे न्यावें. त्याप्रमाणें नोवेंबर महिन्याच्या अखेरीच्या सुमारास त्यानें बरेंच सैन्य सालामांका येथें जमविलें. परंतु सर दाव्हिद बेर्द ह्याच्या हाताखालचें सैन्य ह्या वेळाच्या सुमारास आस्तोर्गापर्यंत अगदीं आंत गेलें होतें; तेणेंकरून त्याची आणि सर जानमूर ह्याच्या सैन्याची गांठ पडण्याचें कांहीं जमलें नाहीं. तो तिकडे आणि हा इकडे असें झालें. इतक्यांत नापोलियन बोनापार्त ह्यानें, आपल्या मोठ्या सैन्यासहवर्तमान स्पेनदेशावर हल्ला करून माद्रिद शहर घेतलें. हें वर्तमान तारीख ३० माहे नोवेंबर रोजीं घडलें. तेव्हां फ्रेंच लष्कराचा पाय पुढें पुढें पडत जाऊन, सर जान मूर ह्यास मागें हटावें लागलें. हा सरदार शूर आणि विचारी होता, ह्याविषयीं सरकाराची व सर्व लोकांची पूर्ण खातरी

होती. परंतु, फ्रेंचांचें सैन्य फारच अवाढव्य असल्यामुळें त्यापुढें त्याचा उपाय चालेना. त्यानें आपली होती तितकी पराकाष्ठा करून पाहिली; परंतु त्यास जय प्राप्त झाला नाहीं. तो आपलें सैन्य घेऊन परत इंग्लंदाकडे येत असतां, फ्रेंचांशीं त्याच्या सैन्याची एक बरीच मोठी लढाई झाली. तींत त्यास बंदुकीची गोळी लागून तो तात्काळ मरण पावला, आणि त्याचे लोक, भराभरा गलबतांत बसून, पोर्तुगालच्या बंदरांतून स्वदेशाकडे निघून गेले. तेव्हां पोर्तुगीज लोकांचा त्यांजवरचा विश्वास अगदीं उडून गेला. आणि त्या देशामध्यें पूर्ववत् फ्रेंचांचें प्राबल्य वाढलें.

हें वर्तमान इंग्लंदास समजलें तेव्हां तेथच्या लोकांस आणि दरबारी मंडळीस फार वाईट वाटलें. आणि ह्या संकटाचें निवारण करण्यास सर आर्थर वेल्सलीसारखा दुसरा कोणी योग्य पुरूष आपल्या देशामध्यें नाहीं, असें सर्वतो मुखीं झालें. आणि, पोर्तुगालदेशामध्यें आपल्या इंग्लंददेशाविषयीं जो अपमानास्पद ग्रह झाला आहे, तो लवकर काढून टाकावा, आणि युरोपखंडामध्यें होईल तितक्या त्वरेनें शांतता स्थापण्याविषयीं आपण झटावें, ह्याविषयीं सर आर्थर वेल्सलीच्या मनांत फार अवेश आला होता. त्या गडबडीच्या वेळीं, कोणत्या रीतीनें कशी तजवीज केली असतां आपल्या देशाचें श्रेष्ठत्व अचल राहील, आणि फ्रेंचांचें प्राबल्य कमी होईल, ह्याविषयीं एक मोठी चांगली सूचना इंग्लंदच्या दरबारीमंडळीस त्यानें केली होती. ती त्यांस फार पसंत पडली. आणि तें कार्य सिद्धीस नेण्याच्या कामावर त्यांनीं त्याचीच योजना केली, आणि त्याचे हाताखालीं पुष्कळ सैन्य दिलें. इकडे पोर्तुगाल देशामध्यें लोकांचीं दुफळी होऊन राहिली

होतीं. सूल्त, ने, इत्यादि फ्रेंच सरदार मोठाल्या सैन्यांसहवर्त्तमान छावण्या करून बसले होते, आणि देशच्या लोकांस आपलेसे करून घ्यावयास पाहात होते. आणि देशांतले लोक आपल्या पहिल्या राजाच्या पक्षाकडे राहून, होईल तितकें करून, स्वराज्य आणि स्वदेशाचें स्वातंत्र्य हीं सुरक्षित ठेवण्यास झटत होते. अशी तेथें एकच गडबड होऊन राहिली होती.

इंग्लिश लोकांचें धैर्य, शौर्य, आणि प्रामाणिकपण ह्यांवरचा पोर्तुगीज लोकांचा विश्वास अगदीं उडाला होता, हें मागें सांगितलेंच आहे. परंतु, सर आर्थर वेल्सली ह्याविषयीं त्यांचा ग्रह फार चांगला झालेला होता, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तो पुरुष खरा शूर, आणि खरा प्रामाणिक, अशी त्यांची खातरी झाली होती. तो आपणांस साह्य करण्यास आणि फ्रेंचांशीं लढण्यास मोठ्या तयारीनें आणि उत्कंठेनें येत आहे, असें जेव्हां त्यांस समजलें, तेव्हां त्यांस फार आनंद झाला, आणि स्वकार्यसिद्धीची विशेष आशा लागली. तो तेगस नदीवर प्राप्त होतांच त्याचे विचार कसे काय आहेत, हें त्यांनीं त्यास विचारून घेतलें; आणि त्यानें ज्या सूचना केल्या, त्या एकदम मान्य करण्याविषयीं त्यांनीं कबूल केलें. त्यांनीं त्याच्या सैन्यास दारूगोळा व इतर साहित्य पुरविण्याकरितां लागलेच जागोजाग कारखाने घातले; आणि आपणांकडचें पुष्कळ सैन्य त्याच्या हवालीं केलें. ह्याप्रकारें करून सर आर्थर वेल्सली ह्याच्या सैन्याची सिद्धता उत्तम प्रकारची झाली. आणि त्याशीं सामना करण्यास तिकडे फ्रेंच सरदार कडीकोट तयारी करून राहिले.

ह्या प्रसंगीं उभय पक्षांकडील सैन्यांची स्थिति कशी होती,

ती चांगली मनांत आणिली पाहिजे. प्रथमतः सूल्त आणि ने हे दोघे सरदार एके ठिकाणीं होते; परंतु इंग्लिश सैन्य आपणाकडे यावयास निघालें, असें कळल्यावर, ने ह्यास उत्तरेकडील प्रांत संभाळण्यास थोड्याशा सैन्यानिशीं मागें ठेवून, सूल्त हा २४००० लोकांसहवर्तमान ओपोर्तो येथें प्राप्त झाला; त्याचे मनांत दुरो नदी उतरून जाऊन लिस्बन शहरावर पडावें, असें होतें. त्याप्रमाणें तो तिकडून निघाला. आणि इकडून सर आर्थर वेल्सली आपलें २००० इंग्लिश सैन्य घेऊन तिकडे चालला. त्याजबरोबर १५००० पोर्तुगीज लोकही त्याच्या साह्यास आले होते. हें सगळें सैन्य इ० स० १८०९ च्या मे महिन्याच्या १२व्या तारखेस दुरोनदीच्या दक्षिण किनाऱ्यावर जाऊन पोहोंचलें. पलीकडच्या बाजूस सूल्त हा आपल्या सैन्यासहवर्तमान प्राप्त झाला. दुरो नदीचें पात्र सुमारें ३०० यार्द रुंद आहे. आणि तिजमध्यें जागोजाग खोल खोल डोहोही आहेत. त्यामुळें, गैरमाहीत मनुष्यांस ती एकदम उतरून जाण्यास फार कठीण पडते. ह्या नदीवर एक तरता पूल होता. तो, इंग्लिशलोक त्यावरून येऊन हल्ला करितील ह्या भयानें, सूल्त ह्यानें मोडून टाकिला, आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें आपलें सैन्य पळ काढण्यास अथवा लढण्यास सिद्ध असावें, अशी सर्व तजवीज ठेविली होती. सूल्त हा सरदार मोठा योद्धा होता; त्याच्या समक्ष नदी उतरून पलीकडे जाणें आणि त्याच्या सैन्यावर हल्ला करणें हें कर्म सामान्य धैर्याचें नव्हतें. परंतु सर आर्थर वेल्सली हा त्यास पुरूनउरण्यासारखा होता. आपण मोठे पराक्रमी आहों, आपलें सैन्य अजिंक्य आहे, आणि शिवाय, आपण पूल मोडून टाकून, आलीकडे येण्याचा

मार्ग नाहींसा केला आहे, त्यापक्षीं शत्रूविषयीं काळजी वाहण्याचें फारसें कारण नाहीं, असें समजून तो फ्रेंच सरदार कांहींसा स्वस्थ राहिला होता. ही संधी पाहून, फ्रेंचांच्या छावणींच्या पुष्कळ खालीं, बऱ्याच अंतरावर, त्या नदीचें एक वळण होतें. तेथें पाणी थोडें होतें; आणि तें वळण फ्रेंचाच्या दृष्टीआड होतें. तेथून सर आर्थर वेल्सली ह्यानें आपलें सैन्य हळूहळू पलीकडच्या तीरावर नेलें; आणि तेथें एक पडकीशी इमारत होती, तिजमध्यें ठाणें घेतलें. हें कांहीं वेळानंतर फ्रेंचांस समजलें. तेव्हां ते मोठ्या आवेशानें येऊन इंग्लिश सैन्यावर पडले. त्या प्रसंगीं उभय पक्षांची चांगलीच चकमक झडली. तींत फ्रेंच लोक पराभव पावले, ते लागलेच पळत सुटले. ते इतके कीं त्यांनीं आपल्या छावणींत देखील दम धारिला नाहीं. कारण, असा जय प्राप्त झाल्यावर, सर आर्थर वेल्सली हा पाठलाग केल्यावांचून स्वस्थ बसावयाचा नाहीं, हें त्यांस ठाऊक होतें. त्याप्रमाणेंच त्यावेळीं घडून आलें. सर आर्थर वेल्सली ह्यानें फ्रेंचांची छावणी घेतली. आणि त्यांस तेथून हुसकून लाविलें. ह्या प्रसंगाचें वर्णन करितांना एका ग्रंथकारानें असें लिहिलें आहे कीं, "त्या दिवशीं सायंकाळीं, जो खाना सूल्त ह्याजकरितां तयार केलेला होता, तो खाना विजयी सर आर्थर वेल्सली ह्यास मिळाला."! परमेश्वराच्या योजना कांहीं विचित्र असतात.

ह्याप्रमाणें सूल्त याचा पराभव केल्यानंतर, सर आर्थर वेल्सली पुढच्या लढाईचा विचार करूं लागला. व्हिक्तर ह्यानांवाचा एक मोठा प्रबल फ्रेंच सरदार होता, त्याजवर स्वारी करण्याच्या तयारीस तो लागला. स्पेन देशामध्यें जें

सैन्य फ्रेंचांस बाहेर घालवून देण्याकरितां सिद्ध झालेलें होतें, त्याचा मुख्य सरदार क्युएस्ता ह्या नांवाचा एक पुरुष होता. तो युद्धविद्येमध्यें चांगला निपुण होता; परंतु ह्या प्रसंगीं फ्रेंचांवर एकदम हल्ला करण्याविषयीं त्याचें अनुमोदन नव्हतें. त्याचा अभिप्राय असा होता कीं, व्हिक्टर याच्या सैन्यास एकाएकीं वेढून टाकण्याचा जो सर आर्थर वेल्सली ह्याचा हेतु होता, तो सोडून देऊन, आपल्या उभयतांच्या सैन्यानें एकत्र होऊन नीट स्पेन देशांत जावें, आणि ज्या ज्या ठिकाणीं शत्रूंची गांठ पडेल, त्या त्या ठिकाणीं, योग्य संधी पाहून त्यांचा पराभव करून टाकावा. हीं मसलत सर आर्थर वेल्सली ह्यास आवडली नाहीं. परंतु थोडक्या गोष्टीवरून आपल्या पक्षामध्यें दुफळी होणें हें चांगलें नाहीं, असें मनांत आणून, त्यानें क्युएस्ता ह्याच्या ह्मण-ण्याप्रमाणें मोहीम करण्याचा ठराव केला. त्याप्रमाणें तो जुलै महिन्याच्या आरंभीं आपल्या सैन्यासहवर्तमान स्पेन देशामध्यें गेला. तेथें त्याच्या आणि क्युएस्ता ह्याच्या सै-न्यांचा संगम झाला. तेव्हां त्यांच्या सेनेमध्यें एकंदर ७८००० लोक झाले. ह्यांत ५६००० स्पेन देशचे होते. व्हिक्टर ह्याजपाशीं ५५००० फ्रेंच लोक युद्धास सिद्ध होते; आणि आणखी पुष्कळ लोक त्याच्या सैन्यास वरचेवर येऊन मिळत होते. इंग्लिशांचें सैन्य माद्रिद शहरावर एकदम येत आहे, असें समजून, तेथला नवा राजा, जोसेफ बोना-पार्त, ह्मणजे नापोलियन बोनापार्ताचा बंधु, हा घाबरून जा-ऊन, आपल्या लोकांसहवर्तमान व्हिक्टर ह्यास येऊन मिळा-ला. तेणेंकरून त्याचें सैन्य पुष्कळच वाढलें. हीं विरुद्ध पक्षांचीं अवाढव्य सैन्यें तालाव्हेरा येथें एकमेकांपासून कांहीं

अंतरावर येऊन उतरलीं. दोहींकडचे सेनापति आपापल्या ठिकाणीं कडीकोट तयारी करण्यांत गुंतले. तेव्हां पुढें मोठें युद्ध होणार, असें स्पष्ट दिसून आलें.

जुलै महिन्याच्या २८ व्या तारखेस लढाईस आरंभ झाला. त्या दिवशीं प्रथमतः फ्रेंचांच्या सैन्यानें इंग्लिशांच्या सैन्यावर हल्ला केला. त्याप्रसंगीं जोसेफ बोनापार्त हा त्यांचे मध्यभागीं घोड्यावर बसून चालला असून, व्हिक्तर आणि जार्दन हे दोन सरदार त्याच्या दोहों बाजूंस होते. ते मोठ्या आवेशानें इंग्लिश सैन्यावर येऊन पडले. तेव्हां, स्पानियार्द लोक, इंग्लिश लोकांप्रमाणें पुढें सरून हातघाईस येऊन त्यांशीं लढले नाहींत, परंतु, त्यांनीं समरांगण सोडिलें नाहीं, हें एक चांगलें केलें. उभय पक्षांकडील वीर एकमेकांस घायाळ करण्यास जीवांकडे न पाहतां झटत होते, आणि कांहीं वेळपर्यंत शस्त्रास्त्रांची अगदीं गर्दी उसळून गेली होती. आपण करीत आहों काय आणि पुढें होईल काय ह्याचें जसें काय त्या वीरांस भान नाहींसें होऊन गेलें होतें. केव्हां ह्या पक्षाचा चढ दिसे, केव्हां त्या पक्षाचा चढ दिसे, असें होतां होतां, शेवटीं इंग्लिश वीरांचें पाऊल पुढें पुढें पडून त्यांस जय प्राप्त झाला, आणि फ्रेंचलोक केवळ पराभव पावले. त्यांचे शेंकडों लोक इंग्लिशांच्या हातीं लागले. आणखी त्यांनीं त्यांच्या १७ तोफा घेतल्या.

दुसरे दिवशीं, ह्मणजे २९ व्या तारखेस, त्यांचें युद्ध पुनः सुरू झालें. आदले दिवशीं फ्रेंचांचा जरी एवढा पराभव झाला होता, तरी त्याच्या योगानें त्यांचें धैर्य कमी झालें नाहीं, इतकेंच नव्हे; तर त्यांस उलटी नवी वीरश्री चढली, आणि ते पहिल्या पेक्षां अधिक आवेशानें इंग्लिशांशीं लढूं लागले.

२८ व्या तारखेप्रमाणेंच पुनः तुमुल युद्ध मांडलें. जसा आपण काल जय मिळविला, तसा आजही मिळवूं, अशा मोठ्या ईर्षेने इंग्लिश लोक लढत होते ; आणि आज मोठा जय मिळवून शत्रूंचा पराभव करून टाकून कालच्या अपजयाचा दुर्लौकिक आजच्या यशानें नाहींसा करूं, अशा उमेदीनें फ्रेंच लोक आपली पराकाष्ठा करून राहिले. असें होतां होतां सूर्य मध्यान्हीं येऊन त्याचें ऊन इतकें प्रखर पडलें कीं उभयपक्षांकडील लोकांस आपापलीं शस्त्रें खालीं ठेवून विसांवा घेणें भाग पडलें. त्या समरभूमीजवळच एक फार निर्मल पाण्याची नदी वाहात होती. ती दोन विरुद्ध पक्षांच्या सैन्यांच्या मध्यें होती. तिजवर, आपल्या तान्हा भागविण्यास दोहींकडचे वीर, समोरासमोर, दोहों तीरांवर येऊन बसले, आणि पाणी पिऊं लागले. एका आईचीं दोन भांडखोर मुलें, एकमेकांचे प्राण घेण्यास प्रयत्न करीत असतां, मध्येंच घरीं यावीं, आणि समोरासमोर बसून, आपल्या मातुश्रीच्या हातचें अन्न खावयास लागावीं, त्याप्रमाणें तेथें तेव्हां खरोखर दृष्टीस पडलें. जरा ऊन टळल्या बरोबर पुनः युद्धास आरंभ झाला. जोसेफ बोनापार्त हा आपल्या सरदारांस उत्तेजन देत होता. ते आपल्या प्राणांकडे न पाहतां जय मिळविण्या करितां भगीरथप्रयत्न करीत होते. परंतु इंग्लिशांच्या सैन्यापुढें त्यांचें कांहीं एक चालेना. ह्या प्रसंगीं सर आर्थर वेल्सली ह्याजकडे खरोखर जीवावर उदार होऊन लढणारे असे सगळे २२००० लोक होते; आणि फ्रेंचांकडे ५५००० हूनही लोक अधिक होते. ह्मणजे इंग्लिशांच्या सैन्याच्या अडीचपट सैन्य फ्रेंचांकडे होतें. परंतु कांहीं वेळ डावीउजवी झाल्यावर, शेवटीं फ्रेंच लोक केवळ पराभव पावले, आणि

सर आर्थर वेल्सली ह्यास जय मिळाला. ह्या दोन दिवसांमध्यें इंग्लिशांकडचे एकंदर ६८२८ लोक मरण पावले. आणि फ्रेंचांकडचे ८७९४ प्राणांस मुकले. जोमिनी ह्मणून एक नामांकित फ्रेंच ग्रंथकार होऊन गेला, त्यानें ह्या लढाईविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "मागच्या शंभर वर्षांमध्यें इंग्लिशांच्या युद्धकौशल्यकीर्तीस उतरती कळा लागली होती, ती नाहींशी करून, ह्या जयानें त्यांचें नांव सर्व युरोपखंडांत गाजविलें, आणि इंग्लिश लोक हे युरोपांतल्या कोणत्याही राष्ट्राशीं लढून जय मिळाविण्यास समर्थ आहेत, असें सर्व जगास दाखविलें."

सर आर्थर वेल्सली ह्यानें तालाव्हेरा येथील जय मोठ्या पराक्रमानें मिळवून, आपल्या देशाचें वजन सर्व पृथ्वीमध्यें पुष्कळ वाढविलें, असें असतां, त्याचा मत्सर करणारे जे कांहीं लोक इंग्लंदामध्यें होते, त्यांनीं त्या सगळ्या कृत्यास भलतेंच स्वरूप देऊन, सर आर्थर वेल्सली ह्यानें फार अविचाराचें मूर्खपण केलें, असा जिकडे तिकडे बोभाट केला. परंतु, राजा आणि त्याचे प्रधान हे फार विचारी होते; लढाई करणें ह्मणजे काय, आणि फ्रेंचांशीं युद्ध करून यश मिळवणें हें किती कठीण आहे, हें त्यांस ठाऊक होतें; ह्मणून त्यांनीं त्या व्यर्थ बोभाटाकडे लक्ष दिलें नाहीं. इतकेंच केवळ नव्हे, तर तें जयाचें वर्तमान समजतांच त्यांनीं त्यास फार शाबासकी दिली, आणि "लार्ड वेलिंगतन अफ तालाव्हेरा," हें मानाचें पद त्याच्या नांवास जोडिलें; आणि त्यास दरसाल २०००० रुपये, दोन पुस्तपर्यंत देण्याचें ठरविलें. तरी, ज्या खर्चानें लढाई चालविण्याचें काम त्यानें पतकरिलें होतें तो खर्च अधिक आहे असें त्यांस वाटूं लागलें.

ह्मास्तव त्यांनीं त्यास असें स्पष्ट कळविलें कीं ह्या युद्धाच्या सार्थकतेची सर्व जबाबदारी तुमच्या माथीं आहे. तें त्यांचें ह्मणणें त्यानें कबूल केलें. ह्यावरून यशाच्या प्राप्तीविषयीं त्यास किती खातरी होती हें उघड दिसून येतें.

तालाव्हरा येथील पराभवाचें वर्तमान नापोलियन बोनापार्तास समजलें तेव्हां त्यास फार वाईट वाटलें. परंतु त्याच्या योगानें त्याची हिंमत खचली नाहीं. आस्पर्न वाग्राम इत्यादि ठिकाणचीं युद्धें आटोपून आणि थोडासा विसांवा घेऊन तो नुकताच किंचित् शांतसा राहिला होता; आणि त्याच्या सैन्यासही थोडीशी विश्रांति सांपडली होती. अशा स्थितीमध्यें असतां वर सांगितलेलें तालाव्हरा येथील वर्तमान त्यास कळलें. तेव्हां त्यानें लागलेंच २८०००० सैन्य जमा करून आणि त्याजवर व्हिक्तर, ने, सूल्त, मार्शीअर आणि मासेना ह्या सरदारांची योजना करून मोठया तयारीनें पिरिनीजपर्वतांच्या मार्गानें स्पेनदेशाकडे पाठविलें. ह्या प्रचंड सैन्यांशीं सामना करण्यास वेलिंग्तनानें (ह्मणजे सर आर्थर वेल्सली ह्यान) पोर्तुगीज वगैरे लोक मिळून ९५००० सैन्य जमवून अगदीं सिद्धकरून ठेविलें. स्पेन देशाच्या सैन्यास ही त्यानें आपल्या साह्यास बोलाविलें होतें व त्याच्या योगानें त्यांच्या देशाचें कोणतें हित होतें, हें त्यांस चांगलें स्पष्ट सांगितलें होतें. परंतु त्यांच्या सरदारानें त्याचें बोलणें ऐकिलें नाहीं. आणि तो त्याजपासून वेगळा राहिला. त्यामुळें फ्रेंच लोकांनीं जिब्रालतर आणि केदीज हीं दोन ठिकाणें खेरीजकरून बाकी सर्व ठिकाणीं त्यांची अगदीं दुर्दशा करून टाकिली. फ्रेंचांचा नामांकित सरदार मासेना ह्यानें आपल्या सैन्यासहवर्तमान नीट वेलिंग्तन होता तिकडे चाल

केली. तेव्हां त्याचें सैन्य संख्येनें पुष्कळ आणि तयारीनें अधिक असें होतें. ह्यामुळें वेलिंग्तनास प्रथम किंचित् पड ध्यावी लागली. अशी थोडीशी माघार घेतल्यावर, आपल्या सैन्याची चांगली व्यवस्था लावून तो बूसाको ह्या नांवाच्या ठिकाणाजवळ येऊन मोठ्या बंदोबस्तानें राहिला. तेथें लवकरच कांहीं अंतरावर, मासेना हा आपल्या सैन्यासहवर्तमान येऊन उतरला.

लार्द वेलिंग्तन आणि मासेना हे एकमेकांच्या सैन्यांकडे पाहात, आणि कोणीकडून कसा हल्ला केला असतां तो सफल होईल ह्याचा विचार करीत कांहीं वेळपर्यंत आपापल्या जागीं तसेच राहिले होते. लार्द वेलिंग्तन तेथें पूर्वींच येऊन राहिला होता, आणि त्यामुळें त्यास उंच आणि चांगली माऱ्याची जागा धरायास सांपडली होती; आणि मासेना हा मागाहून आल्यामुळें त्यास खोलगट मैदानावर छावणी देऊन राहणें भाग पडलें होतें. ह्या दोन्ही गोष्टी मासेना ह्याच्या लक्षांत येऊन चुकल्या होत्या. त्यामुळें इंग्लिशांच्या सैन्यावर हल्ला करण्यास त्याची छाती होईना. आणखी ह्या वेळेच्या सुमारास त्यास असें वर्तमान समजलें होतें कीं, इंग्लिशांचा सरदार कर्नेल त्रांत ह्यानें ताजल येथील फ्रेंचांच्या सैन्यावर हल्ला करून त्यांतले आठशें लोक पाडाव करून नेले. ह्या वर्तमानावरून तर त्याचें धैर्य अगदीं खचलें होतें. परंतु, तितक्यांत नापोलियन बोनापार्ताकडून त्यास युद्ध करण्याविषयीं फार सक्तीचें पत्र आलें. त्यांत त्यानें असें लिहिलें होतें कीं, “साठ सहस्र फ्रेंच लोकांशीं सामना करण्यास पंचवीस सहस्र इंग्लिश लोक बस आहेत, असें समजणें हें मोठें लज्जास्पद लांछन आहे. आपल्या साठ हजारांनीं,

आळस न करितां, मोठ्या आवेशानें जर शत्रूवर हल्ला केला, तर त्यांस खचीत खचीत यश येईल. तुह्मीं स्वस्थ बसूं नये. नीट विचारानें इंग्लिशांवर हल्ला करावा, आणि जय मिळवावा." ह्या पत्रापुढें त्याचा उपाय चालेनासा झाला. आणि तो लागलाच युद्धाच्या तयारीस लागला.

मासेना ह्यानें लढाईची सर्व सिद्धता केली. परंतु त्याच्यानें इंग्लिश सैन्यावर एकदम हल्ला करवेना. तो तसा स्तब्ध राहिलेला पाहून, लार्ड वेलिंग्तन ह्यानें त्याजवर हल्ला करण्याकरितां आपले कांहीं लोक पुढें केले. तेव्हां मासेना ह्यास सैन्यासहवर्तमान पुढें यावें लागलें. इंग्लिशांचें सैन्य उंच जागेवर चांगला मारा धरून उभें राहिलें होतें, आणि फ्रेंचसैन्य खोलगट जाग्यामध्यें होतें. उभय पक्षांकडील वीर पुढें सरसावून, जीवांची आशा न धरितां मोठ्या आवेशानें लढूं लागले. इकडे लार्ड वेलिंग्तन आणि तिकडे मासेना हे आपापल्या योद्ध्यांस उत्तेजन देत होते. आणि ते एकमेकांचा पराभव करण्यास नानाप्रकारच्या युक्ति लढवीत होते. इंग्लिश सैन्यांतील बंदुकांच्या व तोफांच्या धुराचा जो लोट खालीं चालला, त्याच्या योगानें मासेना ह्याचें सैन्य अगदीं गुदमरून गेलें. त्यांतील जे लोक जखमी होत किंवा मरत त्यांची तर गोष्ट सांगावयास नको. परंतु, जे शस्त्रधारी उभे होते, ते भयानें आणि विशेषेंकरून ह्या धुराच्या लोटानें अगदीं घाबरून गेले. त्यांचे हात चालेनात, आणि, जय मिळविण्याच्या आशेनें मासेना हा त्यांस तेथून हालूं देईना. असें होतां होतां संध्याकाळ झाली. दोहोंकडचेही पुष्कळ लोक पतन पावले. परंतु, त्यांत इंग्लिशांची सरशी होती, त्यामुळें त्यांचा युद्धाचा तडाखा एकसारखा चाललाच

होता. शेवटीं मासना ह्याचें धैर्य अगदीं खचलें. तो समरांगणांतून मागें हटला. तो मागें सरलासें दृष्टीस पडतांच त्याचें सैन्य पळत सुटलें. ह्या प्रकारेंकरून बुसाको येथें इ० स० १८१० च्या सप्तेंबर महिन्याच्या २७ व्या तारखेस लार्ड वेलिंग्तन ह्यास मोठा जय प्राप्त झाला. ह्या लढाईमध्यें फ्रेंचांकडील १८०० लोक मरण पावले, आणि तीन हजार लोक जखमी झाले; आणि इंग्लिशांकडील सुमारें तेराशें लोक प्राणांस मुकले. ह्या लढाईच्या योगानें वेलिंग्तन ह्याच्या शौर्याची फार कीर्ति झाली. आणि फ्रेंच लोक त्याला भिऊं लागले. आतां हा भाग बराच लांबला ह्मणून पुरा करितों.

---

## भाग चवथा.

बुसाको येथील गडबड आटोपल्यानंतर, लार्ड वेलिंग्तन ह्याचें लक्ष पुनः पोर्तुगाल देशाकडे लागलें; आणि त्या देशाचें चांगलें संरक्षण करणें हें आपलें मुख्य कर्तव्य कर्म आहे, असें त्यास वाटलें. मागें सांगितलेल्या लढाईतल्या पराभवामुळें फ्रेंचलोक अगदीं पिसाळून गेल्यासारखे झाले होते; आणि ते इंग्लिश सैन्यावर एकदम तुटून पडण्याची तयारी करीत होते; हें लार्ड वेलिंग्तन ह्यास समजलें होतें. तो पोर्तुगाल देशाकडे परत चालला असें पाहून, मासेना ह्यानें त्याच्या सैन्याचा पाठलाग केला. कांहीं वेळपर्यंत इंग्लिश लोक पुढें आणि फ्रेंचलोक मागें, असा क्रम चालला होता. परंतु लार्ड वेलिंग्तन ह्यानें आपल्या सैन्यामध्यें अव्यवस्था न

होऊं देतां, तें मोठ्या तजविजीनें, तारेसव्हेद्रास येथें नेऊन, तेथें राहण्याकरितां त्यानें जी एक फार मजबूद तीन भिंतीं-च्या आंत जागा पूर्वींच बांधून ठेविली होती, त्या जागीं छावणी केली. तारेसव्हेद्रास हें एक लहानसें गांव लिस्बन शहराच्या उत्तरेस सुमारें दाहाबारा कोसांवर आहे. तेथें किल्लाबिल्ला कांहीं नव्हता. परंतु त्या जागीं नाकें धरून राहिलें ह्मणजे पोर्तुगाल देशाचें रक्षण करण्यास अगदीं अवघड पडावयाचें नाहीं, असें मनांत आणून त्या दूरदृष्टि युक्तिवान इंग्लिश सरदारानें, तेथें तळ दिला होता. त्या तीन भिंती, एकीच्या आंत दुसरी, अशा असून, त्यांच्या मध्यें मोठाले खंदक खणिले होते, आणि तिसऱ्या भिंतीच्या पलीकडे इंग्लिशांचें सैन्य होतें. तेथें शत्रूचा उपद्रव होण्याचें भय मुळींच नव्हतें. तरी, तसाच प्रसंग प्राप्त झाल्यास, जलमार्गानें स्वदेशाकडे सैन्यासहवर्तमान जातां यावें, अशी त्यानें योजना करून ठेविली होती. त्या जागेपर्यंत फ्रेंचलोक इंग्लिशांच्या मागें लागत आले. परंतु ह्या ठिकाणीं इंग्लिश लोक आंत जाऊन बसतांच फ्रेंचांचा उपाय चालेनासा झाला. मासेना ह्यानें त्या भिंतींकडे आपलें सैन्य पाठवून, इंग्लिशांवर हल्ला करण्याचे अनेक प्रसंगीं अनेक प्रकारचे प्रयत्न करून पाहिले; परंतु ते सर्व निष्फल झाले. तिकडे इंग्लिश सैन्यास इंग्लंदाहून साह्यास आणखी बरेच लोक आले. त्याच्या योगानें लार्ड वेलिंग्तन ह्यास विशेष धैर्य आलें, आणि फ्रेंच लोकांच्या सरदाराची जयाविषयींची निराशा वाढत चालली.

इंग्लिश सैन्याचा बंदोबस्त कोणत्या ठिकाणीं कमी आहे, हें पाहण्यामध्यें मासेना ह्याचे पुष्कळ दिवस गेले. परंतु त्यास असें स्थळ सांपडलें नाहीं. तथापि त्याला अशी आशा होती

कीं, आपण ह्या इंग्लिश सैन्यास चोहींकडून वेढून उपाशीं मारूं. आणि, भोंवतालच्या प्रदेशांत सामग्री मिळण्याची मोठी मारामार झाली होती, हें पक्कें जाणून, फ्रेंचलोक उपाशीं मरूं लागले ह्मणजे सहज आपोआप परत जातील, असें इंग्लिश सरदार समजत होते. ह्मणजे, ते ह्मणत हे उपाशीं मरतील, आणि हे ह्मणत ते उपाशीं मरतील, असें कितीएक दिवस चाललें होतें. भिंतींच्या आंत इंग्लिश आणि बाहेरच्या बाजूस फ्रेंच, असे तळ स्वस्थ पडले होते, असे कितीएक दिवस लोटले. देशामध्यें कांहीं त्राण राहिलें नव्हतें. तरी तेथें, मासेना ह्याने साठ सहस्त्रलोक आणि वीस सहस्त्र घोडे इतक्यांस दोन महिने पर्यंत पुरे इतकी सामग्री त्यांतून काढिली. पुढें, ती सरल्यावर मात्र त्याचा उपाय चालेना. त्या प्रांतांतले राहाणारे लोक आणि हे फ्रेंचलोक उपासांनीं पटापट मरूं लागले. तेव्हां मासेना ह्याची अगदीं निराशा झाली. ह्या ठिकाणीं आपणास जय खचीत प्राप्त होत नाहीं, असें त्याला वाटलें. त्यावेळीं, इ० स० १८१० च्या नोवेंबर महिन्याच्या १४ व्या तारखेस तेथून परत जाण्यास त्यानें आपल्या सैन्यास आज्ञा केली. तीप्रमाणें मासेना सहवर्तमान फ्रेंच लष्कर निघालें. हें वर्तमान लार्ड वेलिंग्तन ह्यास कळतांच, बरोबर २०००० स्वार घेऊन, तो त्यांच्या पाठीमागें लागला, आणि त्यांची त्यानें अगदीं दाणादाण करून टाकिली. तारेसव्हेद्रास हें ठिकाण फार लहान आहे, परंतु ह्यावर सांगितलेल्या स्मरणीय गोष्टीवरून तें युरोपाच्या इतिहासांत विशेष महत्वाचें झालें आहे.

ह्याप्रमाणें तारेसव्हेद्रास येथील लढाईचा परिणाम झाल्यावर आलमेदा येथील अगदीं नाक्यावरचा किल्ला जो फ्रेंच लो-

कांनीं नुकताच परत घेऊन घ्यापिला होता, तो परत घेण्याच्या विचारानें त्याचें चित्त वेधिलें. त्यानें तिकडे जाण्याची तयारी केली. ही गोष्ट तिकडे नापोलियन बोनापार्तास कळली. तेव्हां त्यानें मासेना ह्यास असा सक्त हुकूम पाठविला कीं, कसेंही करून आलमेदा किल्ल्याचें रक्षण अवश्य झालें पाहिजे. आलमेदा ह्याजकडे जाण्यास इकडून लार्ड वेलिंग्तन निघाला, आणि तिकडून मासेना हा आला. त्याची गांठ इ० स० १८११ च्या मे महिन्याच्या तिसऱ्या तारखेस फ्यूंलिस दीओनोरो येथें पडली. हें ठिकाण आलमेदा ह्यापासून फार लांब नाहीं. लार्डवेलिंग्तन ह्यानें आधींच कांहीं सैन्य आलमेद्यावर पाठविलें होतें, आणि त्यानें त्यास वेढा घातला होता. इकडे गांठ पडल्या ठिकाणीं तिसऱ्या तारखेपासून दाहाव्या तारखेपर्यंत लहान मोठ्या अनेक झटापटी झाल्या. त्यांमध्यें कधीं इंग्लिशांचा जय होई, कधीं फ्रेंचांचा जय होई. परंतु शेवटीं मासेना ह्यानें हात टेंकिले. त्याचा उपाय चालेना, त्याचे लोक निराश झाले; आणि त्यांस जय प्राप्त होण्याची आशा तिळमात्रही राहिली नाहीं. तेव्हां मासेना ह्यानें आलमेदा येथील क्लिलेदार जनरल ब्रेनियर ह्यास सांगून पाठविलें कीं, तुह्मी आंतलें सर्व सामानसुमान आणि बांधींव कामें हीं उडवून देऊन, आपल्या सैन्यासहवर्तमान एकदम आह्मांस येऊन मिळावें. त्याप्रमाणें त्यानें केलें. नंतर १२ व्या तारखेस आलमेदा येथील क्लिा इंग्लशांच्या हातीं लागला. मासेना सैन्यासहवर्तमान सालामांका येथें जाऊन छावणी करून राहिला. वाटेनें त्याचे पुष्कळ लोक अतिशयित हाल भोगून मरण पावले.

हें फ्रेंच लोकांचें पोर्तुगाल देशांतून शेवटचें निघून जाणें होतें. इतके दिवस पर्यंत त्यांनीं इंग्लिशांच्या सैन्यापुढें चांगल्या रीतीनें टिकाव धरिला, हें त्यांच्या शौर्यास फार शोभतें. परंतु, जातां जातां, त्या देशांतील लोकांचे जे हाल त्यांनीं केले, त्यांबद्दल त्यांस जितकें वाईट ह्मणावें तितकें थोडें असें वाटतें. ह्याविषयीं स्वतः लार्ड वेलिंग्टन ह्यानें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "ते लोक जेव्हां पोर्तुगालांतून निघून परत चालले, तेव्हां त्यांनीं जीं क्रूरपणाचीं कर्में केलीं, तशीं क्रूरकर्में पूर्वीं कोणीं कधीं केलीं नव्हतीं, आणि पुढें तशीं कोणाला करितां यावयाचीं नाहींत. फार काय सांगावें, तारेस नोव्हास, थोमार आणि परनीस ह्या शहरांमध्यें त्यांच्या छावण्या होत्या. आणि, जे कोणी येथें येऊन राहतील, त्यांस आह्मी सर्व प्रकारें साह्य देऊन त्यांचें रक्षण करूं, असे जाहीरनामे लाविल्यावरून, त्यांजवर विश्वास ठेवून, कितीएक बाहेरचे लोक तेथें जाऊन राहिले होते. त्या लोकांस देखील फ्रेंचांनीं निघून जाण्याच्या रात्रीं, लुटिलें, आणि त्यांचीं घरें जाळिलीं. आणि पुढें ज्या ज्या गांवांतून ते गेले ते सर्व गांव त्यांनीं जाळून पोळून जमीनदोस्त करून टाकिले." तो भयंकर प्रकार ज्यांनीं स्वतः दृष्टीनें पाहिला होता, त्यांतल्या एकानें त्या वेळची एक गोष्ट लिहून ठेविली आहे. ती पाहिली ह्मणजे तेव्हांच्या त्यांच्या क्रूरपणाचें कांहींसें अनुमान मनांत येतें. ती गोष्ट अशी;—"एका डोंगराच्या माथ्यावर, रस्त्यापासून फार एकीकडे, अशा ठिकाणीं एक मोठें थोरलें घर आमच्या दृष्टीस पडलें. त्यांत जाऊन पाहूं लागलों तों, त्यामध्यें बायका आणि मुलें ह्यांचीं सुमारें तीस चाळीस प्रेतें पडलीं होतीं; त्यांजपाशीं पंधरा सोळा जीवंत

माणसें तडफडत होतीं; आणि तीं इतकीं अशक्त झालीं होतीं कीं त्यांतल्या एकास आह्मीं थोडेंसें कांहीं खायास दिलें तें त्याच्यानें गिळवेना सुद्धां." असा विश्वासघात करणें हें खरोखर मोठें अधमपण आहे.

लार्ड वेलिंग्तन ह्यानें फ्रेंचांचा इतके ठिकाणीं आणि इतके वेळां जरी पराभव केला, तरी त्यांची लढाईची उमेद खचली नाहीं. नापोलियन बोनापार्त ह्यास त्या पराभवाचें वर्तमान समजलें तेव्हां, त्यास इंग्लिशांशीं निकरानें युद्ध करण्याचें स्फुरण विशेष चढलें; आणि त्यानें त्याकरितां सैन्याची तयारी करविली. परंतु लार्ड वेलिंग्तन त्यास पुरून उरण्या सारखा होता. इ० स० १८१२ च्या आरंभानंतर थोडक्याच दिवसांनीं त्यानें सियुदादराद्रिगो, आणि बादाजोझ हे किल्ले फ्रेंचांपासून अशा शिताबीनें घेतले कीं, "इतक्या त्वरेनें हें एवढें कृत्य त्यास कसें करितां आलें कोण जाणे" असें ह्मणून ते लोक अगदीं थक्क होऊन गेले. ह्या वर्षामध्यें फ्रेंच आणि इंग्लिश ह्यांचे अनेक प्रसंग झाले. त्यांतील सालामांका येथें जो झाला तो फार मोठा झाला, आणि ह्मणून तो वर्णनीय आहे. ही सालामांका येथील लढाई इ० स० १८१२ च्या जुलै महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत झाली. तिज मध्यें नापोलियनाच्या सैन्यास जेवढा धक्का बसला, तेवढा पूर्वीं कधींही बसला नव्हता. लढाईस सुरवात प्रथम फ्रेंच लोकांनीं केली. त्या वेळीं त्यांचा मुख्य सरदार मार्शल मारमोंत हा होता. त्याच्या हाताखालीं सैन्य सुमारें पंचेचाळीस हजार होतें. आणि ही वेळ मोठी आणिबाणीची आहे असें समजून ते लोक मोठ्या निकरानें लढले. इकडे लार्ड वेलिंग्तन आणि तिकडे मार्शल मारमोंत हे आपापल्या सैन्यां

मध्यें मोठ्या त्वरेनें हिंडत होते, आणि त्यांतील लोकांस शत्रूं वर हल्ला करण्याविषयीं उत्तेजन देत होते. फ्रेंचांचें सैन्य फार मोठें, आणि तें चांगल्या माऱ्याचें ठिकाण धरून बसलें होतें, तेणेंकरून कितीएक प्रसंगीं इंग्लिशांचा अगदीं मोड होण्याचा रंग आला होता; परंतु लार्ड वेलिंग्तन ह्याच्या विलक्षण शौर्यानें आणि समयोचित व्यवस्थेनें तीं सर्व विघ्नें टळून शेवटीं इंग्लिशांचा जय झाला. त्यांजकडचे मेले व जखमी झाले ह्यांची एकंदर गणती पांच हजार दोनशें झाली. फ्रेंचांकडचे किती मेले हें बरोबर समजलें नाहीं. परंतु, समरांगणीं पडले आणि जखमी झाले ह्यांची एकंदर संख्या सुमारें बावीस हजार असावी, असें कितीएक सुज्ञ आणि शोधक ग्रंथकारांचें मत आहे. ह्या महायुद्धामध्यें लार्ड वेलिंग्तन आणि मारमोंत ह्या दोघांसही एक एक जखम झाली होती. परंतु त्यांपासून त्यांस फारशी इजा झाली नाहीं.

आपले प्रयत्न निष्फल होत चालले आहेत, आणि इंग्लिश लोक एक एक पाऊल पुढें येत आहेत, असें जेव्हां फ्रेंचांच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्यांनीं एकदम पळ काढिला. पुढें फ्रेंच आणि मागें इंग्लिश असें कांहीं वेळ चाललें- ह्या लढाईनंतर फ्रेंच सैन्याचे किती हाल झाले, हें समजण्याकरितां, त्यांचा सरदार जनरल क्लाजेल ह्यानें त्या प्रसंगीं जें एक पत्र लिहिलें आहे, तें वाचून पाहावें. त्या पत्राचें तात्पर्य असें: "अवशिष्ट सैन्य बरोबर घेऊन मी दूरोनदीवर येऊन पोहोंचलों आहें. सैन्यांतील लोकांस आणि जनावरांस चंदीचारा मिळविण्याची अडचण अनिवार्य आहे. आसपासच्या गांवांतील आणि खेड्यांपाड्यांतील बहुतेक लोक जीव घेऊन पळून गेल्यामुळें बहुतेक प्रदेश ओस पडला आहे.

आणि जे थोडेसे लोक आपलीं घरें धरून बसले आहेत, त्यांस दांडगे लुटारू लोक त्रास देऊन हांकून लावीत आहेत. ह्याचा परिणाम असा झाला आहे कीं, आमच्या सैन्यांतील लोक, अन्न अन्न पाणी पाणी करीत करीत, शत्रूंच्या नजरे समोर, सैरावैरा धांवत आहेत." ह्यावरून ह्या प्रसंगीं फ्रेंच सैन्याची अवस्था काय झाली होती, हें सहज लक्षांत येईल.

मारमोंत ह्याचा सालामांका येथें पराभव झाल्याचें वर्तमान नापोलियन बोनापार्ताच्या सर्व छावण्यांत समजलें, तेव्हां त्यांतील सरदारांचे हातपाय अगदीं गळून गेले, आणि आपली गति पुढें नीट दिसत नाहीं, असें त्यांस वाटलें. त्यांतले मुख्य सेनापति दोन, सुचेत आणि सूल्त, ह्यांजपाशीं पुष्कळ फौज होती; तरी त्यांच्याही काळिजानें ठाव सोडिला. स्पेनदेशामध्यें जे सहस्रावधि फ्रेंच लोक पसरले होते, ते सगळे घाबरून गेले. स्वतः राजा, जोसेफ बोनापार्त, हा मारमोंतच्या पराभवाचें वर्तमान समजलें तेव्हां राजधानीच्या बाहेर कोठें गेला होता, तो परत आला. त्याला ही आपली धडगत नाहीं, असें खचीत वाटलें. कारण, इंग्लिश लोक सालामांका येथील विजयाच्या योगानें, विशेष वीरश्री पावून एक एक स्थल काबीज करीत चालले होते, त्याचें वर्तमान त्यास वारंवार समजत होतें. त्यानें सूल्त ह्यास लागलाच असा निरोप पाठविला कीं, 'तुह्मीं अंदालुशिया एकदम सोडून देऊन, आपला बचाव करावा.' इकडे इंग्लिश लोकांस विशेष उत्तेजन येऊन ते, आज हा प्रांत घेतला, उद्यां तें शहर घेतलें, असें करीत करीत माद्रिद शहराकडे वळले. हें कळतांच, जोसेफ बोनापार्तानें, आपलें अवशिष्ट सैन्य बरोबर घेऊन तेथून पलायन केलें.

त्या वेळीं माद्रिद शहराची अगदीं दुर्दशा झाली होती. जोसेफ बोनापार्त हा तेथें आपणास सर्व स्पेनदेशाचा राजा ह्मणवीत असे, आणि त्याप्रमाणें मोठ्या इतमामानें राहात असे. परंतु त्या शहराबाहेरचा थोडासा मुलूख मात्र खरो-खर त्याच्या ताब्यांत होता. तो पुरुष मोठा चैनी होता. त्याचा सर्व काळ ऐषआरामामध्यें जात असे. आणि त्या-मुळें त्याच्या भोंवतीं खुशालचंद रिकामटेकड्या लोकांचें मोठें मंडळ जमलें होतें. त्या सर्वांच्या खर्चास पैसा फार लागे. तितका सगळा पैसा, नाना प्रकारचे कर बसवून, आणि जुलूम जबरदस्ती करून, फ्रेंच लोक, त्या शहरांतील व आसपासच्या आपल्या ताब्यांतील लोकांपासून काढीत असत ; ह्मणजे, जो खर्च सगळ्या स्पेन देशानें चालवावयाचा तो त्या देशाच्या दाहाव्या भागावर पडूं लागला. तेव्हां त्यांतील लोकांस अतिशयित ताप सोसावा लागला, ह्यांत कांहीं विशेष नाहीं. माद्रिद शहरांतला व्यापार बंद पडला होता; आसपासच्या शेतकऱ्यांनीं आपलीं शेतें सोडून दिलीं होतीं; आणि, आपण मिळविलेली भाकर आपणांस खायास सांपडेल कीं नाहीं, असा संशय सर्व लोकांच्या ठायीं उत्पन्न झाल्या-मुळें, उद्योग अगदीं नाहींसा झाला. आणखी त्यांत, फ्रेंच लोकांमध्यें आंतल्या आंत फळ्या होऊन त्यांपासून त्रास होई, तो वेगळाच. अशी माद्रिदच्या लोकांची स्थिति झाली होती. आणि, ह्या फ्रेंच लोकांस हांकून लावण्यास परमेश्वर लवकर कोणास पाठवील तर फार उत्तम होईल, असें मनांत ह्मणून निराश होऊन, ते नशीबावर हवाला ठेवून बसले होते; इतक्यांत, इंग्लिश लोक जवळ आल्याचें वर्तमान त्यांस कळलें. तेव्हां त्यांस जो आनंद झाला, तो त्यांच्या पोटांत मावेना. जोसेफ

बोनापार्त शहरांतून निघून गेल्यावर, इ० स० १८१२च्या आगस्त महिन्याच्या १२ व्या तारखेस इंग्लिश लोक माद्रिदामध्यें प्रवेश करिते झाले. त्या वेळीं, तेथील लोकांनीं मोठा उत्सव केला. जिकडे तिकडे घरें स्वच्छ करून त्यांजवर फुलांच्या माळा लाविल्या; आणि, इंग्लिश सैन्य आंत आलें त्या प्रसंगीं त्यांस पाहण्यास, सर्व आबाल वृद्ध आनंदयुक्त होत्साते रस्त्यांच्या बाजूंनीं आणि गच्च्यांवर गर्दी करून बसले होते. तो प्रकार खरोखर वर्णनीय होय. आलिसन नांवाचा एक नामांकित इंग्लिश ग्रंथकार होऊन गेला, त्यानें ह्याविषयीं आपल्या पुस्तकांत असें लिहिलें आहे. "पुढें निशाणें फडकत आहेत; त्यांच्या मागें मधुर आणि गंभीर वाद्यध्वनि चालला आहे; त्या ध्वनीच्या तालावर, त्याच्या मागें वीरश्रीयुक्त इंग्लिश शिपाई, मोठ्या डौलानें, परंतु प्रेमभावयुक्त असे चालले आहेत; त्यांस पाहण्यास सुंदर सुंदर स्त्रिया आणि लहान गोजिरवाणीं चिमकुलीं मुलें हीं, मोठ्या आनंदयुक्त मुद्राकरून, माड्यांच्या खिडक्यांतून आणि गच्च्यावरून बसलीं आहेत; आणि शहरांतील थोरथोर पुरुष, आपल्या तापहर्त्यांचें आदरातिथ्य मोठ्या अगत्यानें आणि उल्हासानें करीत आहेत. अशी चमत्कारिक शोभा तेव्हां त्या स्थलास आली होती." त्याचें याथातथ्य वर्णन करण्यास खरोखर चांगले कविच पाहिजेत.

हें माद्रिद येथील वर्तमान इंग्लंदास कळलें तेव्हां राजा आणि पार्लमेंत ह्यांस फार संतोष झाला. त्याप्रमाणेंच सर्व लोकांमध्यें लार्द वेलिंग्तन ह्याच्या शौर्याची मोठी ख्याती होऊन, त्याजवर शाबासक्यांची आणि सन्मानांची जशी काय वृष्टि झाली. इंग्लंदामध्यें लार्द वेलिंग्तन ह्यास शत्रुही

पुष्कळ होते. त्यांनीं त्याच्या लढायांतील आणि वर्तणुकीं-
तील व्यंगें शोधून काढून त्यांवरून त्याच्या उज्वल कीर्तीस
कलंक लावण्याचा प्रयत्न मांडिला होता; परंतु तो सर्व व्यर्थ
गेला. राजा आणि पार्लमेंतसभा ह्यांनीं त्यास जमीनजुमला घे-
ऊन देण्याकरितां १०,००,००० रुपये देण्याचें ठरविलें. असो.

माद्रिद येथें बंदोबस्ताकरितां कांहीं लोक ठेवून लार्ड वेलिं-
ग्तन तेथून निघाला. त्यानें प्रथमतः व्हालादालिद येथें
क्लरझेल ह्याचा पराभव करून, पुढें थोडक्याच वेळानें बर-
गास ह्या किल्ल्यास वेढा घातला. हा किल्ला फार मजबूद
होता, आणि ह्यामध्यें फ्रेंचांचें दारूगोळा वगैरे सामान फार
भरलें होतें, ह्मणून त्यांनीं ह्याजवर लोकही पुष्कळ ठेविले
होते. हा किल्ला हातीं लागला असतां आपलें एक मोठें
काम होईल, आणि तें पुढच्या लढायांत फार उपयोगीं पडेल,
असें लार्ड वेलिंग्तन ह्यास वाटत होतें. ह्यास्तव त्यानें तो
घेण्याकरितां आपली पराकाष्ठा करून पाहिली; परंतु कांहीं
उपाय चालत नाहीं असें पाहून पांच आठवडे पर्यंत वेढा
घातल्यावर, तो उठवण्याविषयीं त्यानें हुकूम केला. इंग्लि-
शांचें सैन्य किल्ल्याजवळून उठून चाललें आहे, असें जेव्हां
फ्रेंच लोकांच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्यांस त्यांजवर हल्ला
करण्याचा मोठा आवेश आला, तिकडे सूल्त आणि जो-
सेफ बोनापार्त ह्यांनीं आपलीं सैन्यें एकत्र केलीं; तेव्हां
त्यांजपाशीं एकंदर ७०,००० लोक जमले. त्यांची छावणी
तेगस नदीवर होती. ह्यांशीं सामना करण्यास लार्ड वेलिं-
ग्तन ह्याचे हाताखालीं, स्पेनचे लोकांसुद्धां, सुमारें २२,०००
लोक होते. माद्रिद शहराच्या संरक्षणाकरितां त्यानें हिल-
नामक एका सरदारास ठेविलें होतें, त्याचे हाताखालीं सुमारें

२०,००० लोक होते. त्यासही त्यानें ह्या प्रसंगीं ताबडतोब आपणास येऊन मिळण्याविषयीं हुकूम पाठविला. आणि ह्या एकंदर झालेल्या सैन्यांसहवर्तमान आग्वेदा नदीच्या कांठीं त्यानें चांगल्या बंदोबस्ताचे ठिकाणीं छावणी दिली.

ती नदी बरीच मोठी होती. आणि, लार्ड वेलिंग्तन आपणांवर येत आहे, असें तिच्या पलीकडून फ्रेंच लोक पाहात होते; आणि आपणांकडून मोठ्या लगबगीनें युद्धाची आणि स्वसंरक्षणाची तयारी करीत होते. ही त्यांची सर्व गडबड लार्ड वेलिंग्तन ह्यास कळली होती, तरी तो तिळ-भर देखील गडबडला नाहीं. त्यानें शांतपणानें विचार करून, त्या नदीस कोणकोणत्या ठिकाणीं पार जाण्यासारख्या जागा होत्या, हें शोधून काढून, मोठ्या युक्तीनें आणि धैर्यानें त्यानें आपलें सैन्य पलीकडे नेलें. तेथें त्याच्या आणि फ्रेंचांच्या सैन्याच्या लाहान मोठ्या बऱ्याच झटापटी झाल्या. त्यांमध्यें कार्जेतानो ह्या किल्ल्याजवळ फार मोठी झाली. आधीं फ्रेंच लोक आंत जाऊन राहिले होते, आणि बाहेरून इंग्लिश सैन्यानें त्यांस वेढा घातला होता. कांहीं वेळपर्यंत टिकाव धरिल्यावर, उपाय हरले असें पाहून, फ्रेंच लोकांनीं तो किल्ला इंग्लिश लोकांच्या स्वाधीन केला. ही गोष्ट इ० स० १८१२ च्या जून महिन्याच्या २७ व्या तारखेस घडली. भिंती फोडून इंग्लिश लोक आंत शिरले तेव्हां त्यांस कोणी-ही अडथळा केला नाहीं. त्यांनीं ७०० लोक पाडाव केले; तीस तोफा घेतल्या; ह्याशिवाय दारूगोळा व शिपायांचे कपडे वगैरे पुष्कळ सामान जें त्यांच्या हातीं लागलें तें वेगळेंच. ह्या किल्ल्याजवळच्या लढाईमध्यें एकंदर सुमारें ५०० लोक इंग्लिशांकडचे मरण पावले.

अशा आणखीही कितीएक झटापटी इ० स० १८१२ च्या अखेरीपर्यंत फ्रेंच आणि इंग्लिश ह्यांच्या झाल्या. त्या सर्वांचें वर्णन करावयाचें ह्मटलें ह्मणजे हें प्रकरण फार वाढेल, आणि वाचणाऱ्यांस कदाचित् कंटाळवाणें वाटेल. ह्याकारितां त्या भरीस पडत नाहीं. तथापि, ज्या अति विख्यात लढाया झाल्या आहेत, त्या वगळितां कामास नये. स्पेन देशभर फ्रेंच लोक पुढें आणि इंग्लिश लोक मागें, असें एकसारखें चाललें असतां, इ० स० १८१३ च्या जून महिन्याच्या अखेरीच्या सुमारास व्हितोरिआ येथें उभयपक्षांचें तुमल युद्ध झालें. लार्ड वेलिंग्तन ह्याचे हाताखालीं ह्याप्रसंगीं सुमारें ७५००० सैन्य होतें. तें सगळें चांगलें कवाईत शिकलेलें, आणि आपल्या मुख्याची आज्ञा शिरसामान्य करणारें असें होतें; आणि त्यांतील लोकांमध्यें चांगली वीरश्री होती. फ्रेंचांच्या सैन्याची ह्या प्रसंगींची गणती बरोबर कोठें लिहिली नाहीं. परंतु, त्यामध्यें सगळीं मिळून सुमारें ८०००० मनुष्यें असावीं, आणि त्यांत, युद्धास उपयोगीं पडण्यासारखे असे सुमारें ७५००० तरी लोक असावे, असें ह्मणण्यास कांहीं चिंता नाहीं. ह्यांमध्यें पुष्कळ मोठमोठे सरदार होते; आणि त्या सर्वांचें स्वामित्व जोसेफ बोनापार्त ह्याजकडे होतें. जून महिन्याच्या २१ व्या तारखेस ह्या लढाईस आरंभ झाला. ती दुसऱ्या दिवसाच्या सायंकालापर्यंत चालली होती. कधीं ह्यांचा जय होईल असें वाटे, कधीं त्यांचा होईल असें वाटे. शेवटीं, इंग्लिश लोक अगदीं निकरावर येऊन जेव्हां शत्रूंवर गोळ्यांचा भडिमार करूं लागले, तेव्हां ते केवळ निरूपाय होतसाते मागें हटून पळूं लागले.

बाविसावे तारखेचे सायंकाळीं तेथें जो प्रकार घडला,

त्याचें वर्णन आलिसन ह्या नामांकित ग्रंथकारानें फार चित्त-वेधक रीतीनें केलें आहे. तें इंग्रेजी भाषेंत आहे. त्याचें तात्पर्य असें. "सूर्य अगदीं मावळायास जात होता, तेव्हां त्याचे किरण त्या स्थलावर पडून तें फार विचित्र दिसत होतें. इंग्लिशांकडचा तोफखाना, धो धो धो अशी भयंकर गर्जनाकरीत आणि दशदिशा धुरानें व्यापीत पुढें पुढें चालला होता; त्याच्या मागें तांबड्या लाल डगल्यांचीं पायदळ पलटणें मोठ्या धैर्यानें चाललीं होतीं; त्यांच्या बाजूस आणि मागें घोडेस्वार आपल्या तरवारी बाहेर काढून मोठ्या घाईनें आपले घोडे दामटीत होते; आणि, इतक्या सगळ्यांस भिऊन, फ्रेंचांचें सैन्य, घाबरून, वाट सांपडेल तिकडे पळत होतें." त्यांच्या सुमारें ८० तोफा व्हितोरिआ मैदानापाशीं चांगली जागा साधून ठेविलेल्या होत्या, त्यांजवरील गोलंदाजांनीं कांहीं वेळ धैर्य धरून इंग्लिशांवर गोळ्यांचा वर्षाव केला. परंतु, शेवटीं, त्यांचेही उपाय हरले. फ्रेंच लोकांनीं फ्रान्स देशाकडे जाण्याचा रस्ता धरिला; परंतु तो पूर्वींच इंग्लिश सैन्यानें व्यापिला होता, तेणेंकरून त्यांचे सर्व प्रयत्न फुकट गेले.

ह्या लढाईमध्यें इंग्लिश सैन्यास जितकें सामानसुमान आणि जितकें द्रव्य लाभलें, तितकें, अर्वाचीन काळीं कधीं कोणास सांपडलें नव्हतें, असें आलिसन ह्यानें ह्मटलें आहे, तें अगदीं खरें आहे. फ्रेंच लोक स्वभावतः मोठे चैनी, ते ह्या लढाईमध्यें आपल्या बायकामुलांस-हवर्तमान आले होते, एवढेंच नव्हे; तर त्यांनीं आपल्या वेश्याही बरोबर आणिल्या होत्या. त्या सगळ्या स्त्रिया नाना प्रकारच्या उंची उंची आणि बहुमोल वस्त्राभरणांनीं जशा काय अगदीं ओथंबल्या होत्या. त्या आयत्याच विजयी इंग्लिश

लोकांच्या हातीं लागल्या. त्याच्या योगानें त्यांस किती द्रव्य मिळालें, हें बरोबर कोठें लिहिलें नाहीं; परंतु, तें अपरिमित असावें, असें ग्रंथकाराचें ह्मणणें आहे. ह्याशिवाय पकडलेल्या खजीन्यामध्यें ५५,००,००० दालर* रोख सांपडले, ते वेगळेच. जोसेफ बोनापार्त ह्याचा थोरला रथ आणि त्याची मुख्य तरवार हींही इंग्लिशांस सांपडलीं. १५१ पितळेच्या तोफा, ४१५ दारूच्या मोठ्या पेट्या, १३,००,००० गोळ्या भरलेलीं दारूचीं काडतुसें, १४,००० तोफांचे गोळे, आणि ४०,००० पौंद बंदुकीची दारू, इतकें लढाईच्या उपयोगाचें साहित्य त्यांस रणांगणावर मिळालें. चित्रविचित्र रंगांच्या बैठका; नाना प्रकारचे रेशमी पडदे; फार फार किमतीचे भरजरी पोषाक; सोन्याच्या सांखळ्या; रूप्याचीं तबकें; इत्यादि सामान इंग्लिश शिपायांचे हातीं किती लागलें, ह्याची तर गणती नाहीं. लार्द वेलिंग्तनानें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "त्या (२२ वी च्या) रात्रीं आमचे लोक लूट जमा करण्याच्या कामामध्यें इतके गुंतले होते कीं, दुसरे दिवशीं ते अगदीं थकून जाऊन त्यांस नेहमीं प्रमाणें मजल मारवेना." ह्या समरांगणामध्यें फ्रेंचांकडचे जे मेले आणि जखमी झाले, त्यांची गणती ६,००० भरली. आणखी, एक हजार लोक इंग्लिशांनीं पाडाव करून नेले ते वेगळेच. थोडें चुकलें; नाहींतर जोसेफ बोनापार्त हा देखील त्यांचे हातीं लागला असता. पाडाव केलेल्या मनुष्यांमध्यें जीं बायकामुलें होतीं, त्यांत कितीएक थोर सरदारांचीं कुटुंबें होतीं; त्यांस लार्द वेलिंग्तन ह्यानें फार ममताळूपणानें आणि उत्तम रीतीनें वागविलें. हें त्यास फार भूषणप्रद होय.

* एक दालर ह्मणजे २ रूपये ८ आणे ६ पै.

ह्या प्रकारेंकरून व्हितोरिआ येथील लढाईमध्यें लार्ड वेलिंग्तन ह्यास जय मिळाला. ह्याचें वर्तमान इंग्लंदास कळलें तेव्हां राजा आणि पार्लमेंतसभा ह्यांस फार संतोष झाला. सर्व लोकांमध्यें लार्ड वेलिंग्तनाची मोठी वाहवा झाली. आणि त्याजवर मानांची आणि देणग्यांची जणु काय वृष्टिच झाली. ह्याच प्रसंगीं राजानें त्यास "दूक" ही पदवी दिली. तेव्हांपासून त्यास दूक आफ वेलिंग्तन असें ह्मणूं लागले. ह्या लढाईच्या योगानें स्पेन आणि पोर्तुगाल ह्या दोन्ही देशांमध्यें फ्रेंचांचें प्राबल्य नाहींसें झालें. आरंभापासून ह्या वेळापर्यंत ह्या दोन देशांमध्यें फ्रेंच आणि इंग्लिश ह्यांचीं जीं अनेक लहानमोठीं युद्धें झालीं, त्यां सर्वांस, युरोपाच्या इतिहासामध्यें 'द्वीपकल्पमहायुद्ध' असें ह्मटलें आहे.

फ्रेंच लोकांस पोर्तुगाल आणि स्पेन ह्या देशांतून हांकून लाविल्यावर, त्या देशांचे राज्यकारभार यथास्थित चालले; आणि त्यांमध्यें दूक आफ वेलिंग्तन ह्याचें मत वारंवार घेऊं लागले. कारण, ही शांतता आपणांस त्या पराक्रमी पुरुषानें दिली आहे, असें तेथले अधिकारी आणि सर्व लोक समजत होते. फ्रेंच हे त्रासदायक लोक पिरिनीज पर्वतांच्या पलीकडे आपल्या देशांत गेले, तरी दूक आफ वेलिंग्तन ह्यानें त्यांची पाठ सोडिली नाहीं. कारण, त्यांस जर तसेंच मोकळें सोडून दिलें, तर ते पुनः परतून पहिल्याप्रमाणें धुमाळी माजवितील, हें त्यास ठाऊक होतें; आणि ह्या मोहिमीचा उद्देश, पोर्तुगाल आणि स्पेन ह्या देशांस फ्रेंचांच्या जाचांतून सोडवावें एवढाच नव्हता; तर, ते लोक जे इतर सर्व राष्ट्रांस त्रास द्यावयास लागले होते, त्यांचा मोड करून, युरोप खंडांत स्वस्थता स्थापित करावी हा होता. ह्मणून, दूक आफ

वेलिंग्तन ह्यानें, आपल्या सैन्यासहवर्तमान फ्रान्स देशामध्यें प्रवेश केला. हें पाहून तिकडे फ्रेंच लोक त्याशीं लढण्याची तयारी करूं लागले. ते आर्थीज नांवाच्या ठिकाणीं, टेंकड्यांवर, चांगला मारा धरून बसले. त्यांचा मुख्य सरदार सूल्त होता. त्या ठिकाणाकडे इंग्लिश सैन्याचा रोंख वळला. तिकडे जातांना त्यांस एक नदी उतरावी लागली. त्या कामांत त्यांस बरेच श्रम पडले.

आर्थीज ह्या ठिकाणाकडे जातांना, डूक आफ वेलिंग्तन ह्यानें, नेहमींप्रमाणें, आपल्या सैन्याची व्यवस्था फार उत्तम ठेविली होती. हा पुरुष स्वभावतः मोठा न्यायी आणि सरळमनाचा होता. त्यास गैर शिस्त गोष्ट तिळभर देखील सोसत नसे. त्याचें सैन्य शत्रूच्या देशांतून चाललें होतें, तरी तेथील रहिवासी लोकांच्या तनसडीस देखील तुह्मीं हात लावितां कामास नये, अशी त्यानें आपले लोकांस सक्त ताकीद दिली होती. एवढेंच केवळ नव्हे; तर त्या प्रांतामध्यें गांवांचा बंदोबस्त ठेवणारे जे फ्रेंच अधिकारी होते, त्यांसही असें कळविलें होतें कीं तुमच्या ताब्यांत आमचे कडील कोणी लोक जर दांडगावा किंवा लुटालूट करितील, तर त्यांस तुह्मीं एकदम पकडावें. त्याप्रमाणें एक गोष्ट घडून आली. ती अशी,—इ० स० १८१४ च्या मार्च महिन्याच्या २६ व्या तारखेच्या रात्रीं कोणा एका इंग्लिश शिपायाने एका गांवांत शिरून कांहीं दांडगाई केली. त्यास तेथील लोकांनीं गोळी घातली. तिच्या योगानें तो जखमी झाला. त्यास डूक आफ वेलिंग्तनासमोर आणिल्यावर, त्यानें त्याची चौकशी केली. तेव्हां तो खराच अपराधी ठरला. तेव्हां लागलेंच त्यानें त्यास फांशीं दिलें. ह्यावरून, डूक आफ वेलिंग्तन ह्याचें मन कसें होतें, हें स्पष्ट दिसून येतें.

सत्ताविसाव्या तारखेच्या सकाळीं, सूर्योदय होतांच इंग्लिश सैन्यांतील एका टोळीनें फ्रेंचांवर मोठ्या निकरानें हल्ला केला. तिचा मुख्य सरदार पिक्तन हा होता. फ्रेंच लोक चांगली जागा साधून बसले होते, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आणखी दुसरें तेथें असें होतें कीं, त्या ठिकाणाकडे जाण्यास ज्या वाटा होत्या, त्या दऱ्याखोऱ्यांतून वेड्यावांकड्या असून फार निरुंद होत्या. तरी पिक्तन ह्यानें त्यांतूनही आपले लोक पार पाडून उघड्या मैदानावर आणिले, आणि शत्रूं-वर हल्ला करण्याकरितां चाल केली. हें सर्व कृत्य ड्यूक आफ वेलिंग्तन हा, कांहीं सैन्यासहवर्तमान जवळच्या एका टेकडीवर बसून तेथून लक्षपूर्वक पाहात होता. त्यास असें वाटलें कीं, शत्रूच्या सैन्याच्या मानानें पिक्तन ह्याजबरोबर आहे त्या-पेक्षां अधिक सैन्य असणें आवश्यक आहे. ह्मणून त्यानें लाग-लीच दुसरी एक टोळी त्याच्या साह्यास पाठविली. उभय पक्षांचें युद्ध जुंपलें. उभयपक्षांकडील वीर एकमेकांवर चव-ताळून धांवून जात होते आणि गोळ्यांचा वर्षाव करीत होते. फ्रेंच हे उंच ठिकाणावर होते, ह्यामुळें त्यांस इंग्लिशांवर मारा करण्यास फार सोईचें पडे; तेणेंकरून, इंग्लिश सैन्यास, कधीं कधीं मध्येंच थबकावें लागे. हें वेलिंग्तनानें पाहिलें. तेव्हां तो आपलें जवळचें सैन्य घेऊन लागलाच त्यांच्या साह्यास गेला. आणि, फ्रेंचांवर कोठें कोणत्या प्रकारें हल्ला केला असतां आपलें कार्य सिद्धीस जाण्यासारखें आहे, हें त्यानें त्या टेकडीवरून पूर्वींच पाहून ठेविलें होतें, त्याप्रमाणें एकदम हल्ला करून त्यांचा अगदीं मोड करून टाकिला. ह्या युद्धामध्यें फ्रेंचांचा फोय ह्मणून एक मोठा सरदार गोळी लागून मरण पावला; आणि सूल्त ह्यास आपल्या खातरीच्या

लोकांसहवर्त्तमान पळ काढावा लागला. सालामांका आणि व्हितोरिआ येथील लढायांमध्यें जसें अपरिमित सामान इंग्लिशांच्या हातीं लागलें होतें, तसें ह्या लढाईंत लागलें नाहीं, हें खरें आहे. तरी ह्या प्रसंगीं शत्रूंचा नाश फार झाला. त्यांजकडचे मेले, जखमी झाले, आणि पाडाव केले, इतक्यांची एकंदर गणती तीन हजार नऊशें पर्यंत सांगितली आहे. शिवाय, त्यांच्या साहा तोफा इंग्लिशांच्या हातीं लागल्या. इंग्लिशांकडील सुमारें दोन हजार तीनशें लोक जायां झाले.

अशा प्रकारें आर्थीज जेथें पराभव पावल्यावर सूल्त हा, आपल्या अवशिष्ट सैन्यासहवर्तमान तूलूझ येथें प्राप्त झाला. तेथें त्यानें आसपासचें आपलें सगळें सैन्य जमविलें; आणि त्या ठिकाणीं दारूगोळ्याचा वगैरे संग्रह फार पोक्त असून, त्याच्या भोंवतालच्या भिंती चांगल्या मजबूद होत्या. त्यावरून, आपणास सुरक्षित राहण्यास आणि शत्रूवर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करण्यास तें फार सोईचें आहे, असें त्यास वाटत होतें. तो तेथें मोठ्या बंदोबस्तानें जाऊन राहिल्याचें वर्तमान डूक आफ वेलिंग्तन ह्यास कळतांच, तो आपल्या प्रचंड सैन्यासहवर्तमान तिकडे जावयास निघाला. वाट अडचणीची होती; आणि इंग्लिशांच्या सैन्याबरोबर तोफा, दारूगोळे वगैरे सामान पुष्कळ होतें. तरी, मोठी त्वरा करून, डूक आफ वेलिंग्तन हा चार मजलांनीं तेथें येऊन दाखल झाला. त्याज बरोबर एकंदर सैन्य बावन हजार होतें. त्यांत कांहीं पोर्तुगीज लोक होते, कांहीं स्प्यानियर्द होते, आणि बाकीचे इंग्लिश होते. ह्यांमध्यें सात हजार स्वार आणि चौसष्ट मोठ्यामोठ्या तोफा होत्या. ह्या एवढ्या सैन्याचा वेढा बाहेरून पडला होता. आणि शहरामध्यें

सुमारें ४० हजार फ्रेंच होते; ते कडीकोट बंदोबस्तानें राहिले होते. त्यांतले, दोन हजार लोक अंतर्भागीं ठेवून, अडतीस हजार लोक सूल्त ह्यानें लढाईकरितां पुढें आणिले. ते पुढें आलेसें पाहून, इ० स० १८१४ च्या एप्रिल महिन्याच्या १० व्या तारखेस, प्रातःकाळीं सात वाजतां, डूक आफ वेलिंग्तन ह्यानें त्यांजवर चाल करून जाण्याविषयीं आपले लोकांस हुकूम केला. ते पुढें गेले. तसे फ्रेंच लोकही मोठ्या आवेशानें पुढें सरसावले. त्यांचे ह्यांचे हात होतां होतां, प्रथम, इंग्लिश सैन्यांतले स्प्यानियार्द लोक किंचित् कचरले, आणि मागें सरले. तेव्हां इंग्लिश पक्षाचा पराभव खचीत होतो, असें वाटलें. हें दृष्टीस पडतांच इंग्लिश लोक मोठ्या वीरश्रीनें फ्रेंचांच्या आंगावर चालून गेले, तेव्हां फ्रेंच लोक कांहींसे थबकले. असें चालतां चालतां शेवटीं, फ्रेंचांच्या सैन्याचा आंतले आंत इतका घोंटाळा झाला कीं, आपण आतां करावें काय हें देखील त्यांस सुचेनासें झालें. तेव्हां ते मागें सरत सरत, दुसऱ्या वाटेनें पळून गेले, आणि डूक आफ वेलिंग्तनानें बाराव्या तारखेस मोठ्या जयघोषानें शहरांत प्रवेश केला. ह्या युद्धामध्यें इंग्लिशांस जय मिळाला, तरी त्यांजकडील चार हजार पांचशें अठ्ठावीस लोक पतन पावले. फ्रेंचांकडील मेले आणि जखमी झाले ह्यांची गणती तीन हजार दोनशें इतकी भरली. ह्याशिवाय, एक हजार साहाशें फ्रेंच लोक बाराव्या तारखेस इंग्लिशांच्या हातीं लागले, ते वेगळेच.

असें इकडे चाललें असतां, तिकडे पारिसशहरामध्यें, नापोलियन बोनापार्त, लढायांत पराभव पावून, आणि अगदीं निरुपाय होऊन, मार्च महिन्याच्या सव्विसाव्या तारखेस

राजपद सोडिता झाला. हें वर्तमान, वर सांगितलेली लढाई होण्यापूर्वी चार दिवस सूल्त ह्यास कळलें होतें; परंतु, तें त्यास खरें वाटलें नव्हतें; आणि तो त्याचा खरा नौकर होता; ह्मणून त्यानें तें कानामागें टाकून युद्धाचें काम तसेंच पुढें चालविलें. त्याचा परिणाम हा असा होण्यास, आणि तिकडे खरेंच असें झालें आहे असें वर्तमान त्यास खचीतपणें कळण्यास एक गांठ पडली. तेव्हां त्यानें दूक आफ वेलिंग्तनाशीं तह केला. नंतर वेलिंग्तन हा तेथून पारिस शहरामध्यें गेला. तेथें गडबड चालली होती, ती मोडण्याच्या कामीं त्यानें पुष्कळ परिश्रम केले. आणि त्या संबंधानें त्याच्या मसलती फार उपयोगीं पडल्या. त्यांवरून त्याची मोठी वाहवा झाली. तो इकडे पारिस शहरामध्यें असतां, तिकडे इंग्लंदामध्यें त्याची मोठी ख्याति होऊन त्याजवर मानप्रद पदव्यांची आणि नवनव्या बहुमोल नेमणुकांची केवळ वृष्टि झाली. नापोलियन एल्वा बेटांत गेला, आणि फ्रान्स देशामध्यें स्वस्थता येऊं लागली, तेव्हां दूक आफ वेलिंग्तन हा स्वदेशीं परत यावयास निघाला.

तो इंग्लंदास येऊन पोहोंचल्यावर त्याच्या सन्मानार्थ एक दोन मोठमोठीं दरबारें झालीं. त्यांमध्यें त्याची फार स्तुति होऊन, त्याला ज्या नव्या पदव्या मिळाल्या होत्या, त्यांच्या संबंधाच्या सनदा वाचून दाखविल्या. त्या वेळीं सर्व मंडळीस मोठा संतोष झाला. ह्या सनदा वाचिल्या त्या सभेमध्यें दूक आफ वेलिंग्तन ह्याची मातुश्री आणि बायको ह्या दोघीही होत्या; त्यांस परमाल्हाद झाला. त्या मातेचा हर्ष तर त्रैलोक्यांत मावेनासा झाला असेल. ठीकच आहे. राजे, प्रधान, दिवाण, अशीं देशांतलीं जीं थोरथोर मनुष्यें,

त्यांनीं आपल्या लेंकरास थोर ह्मटलेलें ऐकणें, हें खरोखर मोठ्या पुण्याईचें फल होय. त्या सभेंत त्याचें जें स्तुतिस्तोत्र झालें, त्याविषयीं त्यानेंही आपलें मत थोडक्यांत आणि मोठ्या नेमस्तपणानें बोलून दाखविलें. त्यांत त्यानें असें सांगितलें कीं, "इंग्लिश सैन्याला जें यश ह्मणून मिळालें, त्यास कारण मी एकटा नव्हे, तर त्या यशाचे भागीदार इतर सरदारही मजप्रमाणेंच आहेत. आणखी असें आहे कीं, सरकारांनीं कृपा करून वारंवार साह्य पाठविलें, ह्मणून आमचें काम आह्मांस चांगलें बजावितां आलें. ह्याकरितां आह्मी आमच्या सरकाराचे फार आभार मानितों."

हे इकडचे मानपानाचे समारंभ आटोपल्यावर, थोडक्याच वेळानें, युरोपांतील सर्व प्रमुख राजांचें दरबार कोठें तरी भरावें, आणि युरोपाच्या स्वस्थतेकरितां कांहीं नियम ठरवून त्यांप्रमाणें सर्वांनीं चालावें, असा विचार निघाला. त्याप्रमाणें रुशिआ, आस्त्रिआ, प्रुशिआ, इंग्लंद, फ्रान्स, इत्यादि ठिकाणच्या राजांनीं किंवा त्यांजकडील कोणीं दिवाणांनीं विएना येथें एकत्र मिळावें असें ठरलें. ही प्रसिद्ध सभा इ० स० १८१४ च्या सप्तेंबर महिन्याच्या २५ व्या तारखेस भरली, आणि पुढें कांहीं दिवस चालली होती. तिजमध्यें इंग्लंदाच्या वतीनें ड्यूक आफ वेलिंग्तन हा आला होता; ह्यावरून, त्या वेळीं त्याची योग्यता किती वाढली होती, ह्याचें सहज अनुमान करितां येतें. त्या सभेमध्यें नानाप्रकारच्या विषयांवर पुष्कळ वादविवाद झाले. तेथें जमलेले राजे आणि मंत्री हे बाह्यात्कारीं परस्परांशीं मोठ्या प्रेमभावानें आणि मोकळेपणानें वागत होते; परंतु त्यांचीं मनें शुद्ध नव्हतीं. ते विशेषेंकरून आपापल्या देशांच्या हिताकडे

लक्ष ठेवून बोलत असत. तेथें शेवटीं काय ठरलें, हें सांगण्याचें हें ठिकाण नव्हे. परंतु एवढ्या मोठ्या राजकीय प्रकरणांत डूक आफ वेलिंग्तन हा इंग्लंदाच्या वतीनें नेमला होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

विएना येथील सभेचें काम आटोपल्यावर डूक आफ वेलिंग्तन हा परत इंग्लंदास गेला. तेव्हां युरोपांतली बहुतेक गडबड मोडली होती, आणि सर्व राज्यांचीं कामें पूर्ववत् स्वस्थपणें चालूं लागलीं होतीं. परंतु, इतक्यांत त्यांच्या स्वस्थपणास पुनः व्यत्यय आला, आणि तेणेंकरून सर्व राष्ट्रांचीं मनें पुनः उद्विग्न झालीं. त्याचा प्रकार असा. स्वसंतोषानें फ्रान्सची गादी सोडून देऊन नापोलियन बोनापार्त जो एल्बा बेटांत जाऊन राहिला होता, तो बाह्यात्कारीं मात्र नरम आल्यासारखा दिसत होता. परंतु आंतून त्याच्या कपटयुक्ति एकसारख्या चालल्या होत्या. तो सिंहासनारूढ असतां, जे कांहीं लोक त्याच्या जीवास जीव देणारे असे ह्मणवीत होते, त्यांशीं फार गुप्तपणें त्याचा पत्रव्यवहार चालला होता, व आपलें नष्ट झालेलें वैभव पुनः कोणत्या रीतीनें मिळवावें ह्याच्या मसलती तो करीत होता. त्या परिपूर्ण झाल्या; आणि तो इ० स० १८१५ च्या फेब्रुआरी महिन्याच्या २५ व्या तारखेच्या रात्रीं गलबतांत बसून, १२०० लोकांसहवर्तमान तेथून निघाला, तो मार्चच्या पहिल्या तारखेस एकाएकीं पारिस शहरांत प्राप्त झाला. मग काय विचारावें? त्याला अनुकूल असे जे लोक तेथें होते, ते त्यास साह्य करण्यास लागलेच त्याभोंवतीं मिळाले, आणि त्यांच्या साह्यानें त्यानें तेथला राजा अठरावा लुई ह्यास शहरा बाहेर हांकून लाविलें. तेव्हां पारिस शहरामध्यें पुनः

सगळा गोंधळ होऊन गेला. आपण आपलें पद पुनः मिळविलें आहे, हें राखण्यास आपणांस युरोपांतील इतर सर्व राजांच्या एकत्र झालेल्या सैन्याशीं लढलें पाहिजे, हें नापोलियन जाणून होता. ह्मणून लागलाच तो त्या तयारीस लागला. त्यानें पुष्कळ सैन्य जमा करून युद्धाची सर्व सिद्धता केली..

हें सगळें वर्तमान इंग्लंदांत कळतांच, सर्व लोकांचे डोळे पुनः दूक आफ वेलिंग्तन ह्याजकडे वळले; आणि नापोलियनाची बंडाळी मोडण्यास त्याशिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं, असें ते बोलूं लागले. तो शूर आणि यशस्वी पुरुष ही स्वदेशाची सेवा करण्यास एका पायावर सिद्ध होता. त्यास राजाज्ञा होतांच, तो आपल्या स्वतःच्या व साह्यकारी राजांच्या सैन्यासहवर्तमान मोठ्या आवेशानें नापोलियन बोनापार्तावर जायास निघाला. तिकडे नापोलियन बोनापार्तही शत्रूची मार्गप्रतीक्षा करीत, वातर्लू ह्मणून जें एक चांगलें ठिकाण आहे तेथें येऊन राहिला. तेथपर्यंत इंग्लिशांचें सैन्य येऊन पोंचेपर्यंत त्यास मध्येंच मार्गावर शत्रूंशीं एक दोन लहानशा झटापटी कराव्या लागल्या. त्यांमध्यें त्यांस यश आलें नाहीं. शेवटीं, तें वातर्लूजवळ येऊन थडकलें. तीं दोन्हीं सैन्यें एकमेकांपासून सुमारें कोसा दीड कोसाच्या अंतरावर छावण्या देऊन राहिलीं. इंग्लिशांकडे, इतर साह्यकारी लोकांसुद्धां ४९६०८ पायदळ, १२४०२ स्वार, ५६४५ गोलंदाज, आणि १५६ तोफा इतकी सेना होती. फ्रेंचांकडे ४८९५० पायदळ, १५७६५ स्वार, ७७३२ गोलंदाज, आणि २४६ तोफा, इतकी फौज होती. एकमेकांवर चालून जाण्याच्या तयारीमध्यें कांहीं काळ गेला. इ० स० १८१५ च्या जून

महिन्याच्या १७ व्या तारखेचा दिवस मावळला. रात्र पडली. दोहींकडे लढाईची तयारी कडीकोट होऊन राहिली होती. इतक्यांत रात्रीस एवढा मोठा पाऊस पडला कीं, त्या दोन्ही छावण्यांमध्यें सगळें पाणीच पाणी होऊन गेलें. तंबू पुष्कळ होते, परंतु त्यांचा फारसा उपयोग झाला नाहीं. सामानसुमान आणि शिपायांचे अंगावरचे कपडे अगदीं चिंब भिजून गेले. त्या रात्रीं उभयपक्षांकडील बहुतेक शिपायांस शुद्ध पाण्यामध्यें चारी प्रहर काढावे लागले. त्यामुळें त्यांतले कितीएक असे ताठून गेले होते कीं, त्यांच्यानें जागेवरून हालवेना. अशी अवस्था जरी झाली होती, तरी विजयश्रीनें उभयपक्षांकडील वीरांचे बाहु फुरफुरत होते; आणि उजाडेल केव्हां, आणि प्रतिपक्षावर हल्ला करूं केव्हां असें त्यांस झालें होतें. शेवटीं उजाडलें; सूर्योदय होऊन प्रकाश पडला. नंतर लागलेंच युद्ध सुरू झालें. त्यामध्यें अनेक प्रकारच्या झटापटी होऊन उभयपक्षांकडील पुष्कळ शूर पुरुष रणांगणीं पतन पावले. आज लढाई जिंकिली, तर मागच्या इतक्या वर्षांच्या भगीरथ उद्योगाचें खरें सार्थक्य झालेंसें होईल, आणि जर ही वेळ चुकली, तर सर्व जगामध्यें आपली अतिशयित अपकीर्ति होईल, असें मनांत पक्कें समजून, दोहींकडचे वीर केवळ हातावर मस्तक धरून लढले. फ्रेंचांनीं तर आपली पराकाष्ठा करून सोडिली; परंतु शेवटीं ते पराभव पावून पळत सुटले. इंग्लिशांचा जय झाला, आणि ते शत्रूंच्या मागें लागले. इतकें झालें तरी, तितक्यांत चार तोफा एका टेंकडीवर चढवून तेथून नापोलियनानें स्वतः इंग्लिश सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव केला. त्यांतला एक गोळा लार्द अक्सब्रिज ह्या सरदाराच्या पायास

लागला. हा सरदार ड्यूक आफ वेलिंग्तन ह्याच्या अगदीं शेजारीं होता.

इतकेंही करून आपलें पाऊल पुढें पडत नाहीं, असें पाहून नापोलियन बोनापार्त घोड्यावर बसून रणांगणांतून पळून गेला. तेव्हां त्याच्या सैन्याचा विसकट होऊन जो नाश झाला त्याचें वर्णन सुद्धां करवत नाहीं. ह्या समरांगणावर त्याचे चाळीस पंचेचाळीस हजार लोक पतन पावले. आणि इंग्लिशांकडचे सुमारें वीस बावीस हजार पडले. एके प्रसंगीं युद्ध अगदीं निकरावर आलें तेव्हां, पंचाणवाव्या पलटणीस लक्षून ड्यूक आफ वेलिंग्तन मोठ्या आवेशानें ह्मणाला, "माझ्या शिपायांनो, हटूं नका, हटूं नका. आपणांस आपल्या देशचे लोक काय ह्मणतील, ह्याचा चांगला विचार करा." त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, "महाराज, आमचें कर्तव्य कर्म आह्मांस ठाऊक आहे तें आह्मी बजावितों," असें उत्तर देऊन ते पुढें सरले, आणि मोठ्या आवेशानें लढले, तेव्हां त्यांस यश आलें. अशा आणखी एक दोन गोष्टी इतिहासामध्यें सांगितलेल्या आहेत. त्यांवरून, आपल्या देशाच्या संबंधानें आपलें कर्तव्यकर्म काय आहे, हें त्या लोकांस विदित होतें, ह्मणूनच त्यांस हें महद्यश प्राप्त झालें, असें दिसतें. आपलें कर्तव्यकर्म समजत नाहींत अशीं मनुष्यें जगामध्यें फार थोडीं निघतील. परंतु, तें कळत असून, आळसानें किंवा मूर्खपणानें त्याची उपेक्षा करणारीं अशीं पुष्कळ सांपडतील. ज्या देशामध्यें आपलें खरें कर्तव्यकर्म काय तें जाणून तें करणारीं अशीं माणसें पुष्कळ असतात, तोच देश भाग्यवान होतो. आमच्या ह्या हिंदुस्थान देशांत अशा लोकांची फार वाण आहे. ती परमेश्वर कृपेनें लवकर दूर होवो.

वातर्लूचा प्रसंग हा डूक आफ वेलिंग्तन ह्याचा शेवटचा संग्राम होय. ह्या वेळानंतर त्यानें पुनः तरवार अशी कधीं-ही हातीं घेतली नाहीं. हिंदुस्थानामध्यें ह्यानें ज्या लढाया मारिल्या, त्या कांहीं कमी महत्वाच्या नव्हत्या; परंतु युरोप-खंडामध्यें, नापोलियनाचा बंडावा मोडण्याकारितां ह्मणून जी एकदा तरवार हातांत धरिली, ती त्याचें पुरतें पारिपत्य होईपर्यंत त्यानें खालीं ठेविली नाहीं. वातर्लूची लढाई झाल्यावर, नापोलियन बोनापार्त हा फ्रान्सांतून बाहेर पडून, अमेरि-काखंडाकडे जाण्यास पाहात होता; परंतु तें कार्य आपले हातून सिद्धीस जावयाचें नाहीं, असें त्यास वाटल्यावरून, तो आपण होऊन इंग्लिश सरकारचे स्वाधीन झाला. त्यानें त्यास सेंत हेलिना बेटावर नेऊन ठेविलें. तेथें तो इ० स० १८१५ च्या अक्तोबर महिन्याच्या १३ व्या तारखेस पोहोंचला. तो त्या प्रतिबंधांत असतांच, इ० स० १८२१ च्या मार्च महिन्याच्या २१ व्या तारखेस मरण पावला. ह्या प्रकारेंकरून, रंकाचा राव झालेला, सर्व युरोपखंडास तापप्रद झालेला, आणि इंग्लिश सरदार डूक आफ वेलिंग्तन ह्याच्या तडाख्या खालीं सटव्यास येऊन पुनः रंक झालेला जो जग-विख्यात नापोलियन बोनापार्त त्याची अखेरी झाली. हा अगदीं मरेपर्यंत डूक आफ वेलिंग्तन ह्यास पाण्यांत पाहात होता. त्याविषयीं एक स्पष्ट प्रमाण आहे. तें असें कीं, क्यांतिलन ह्या नांवाच्या मनुष्यानें त्या विजयी डूकास ठार मारण्याकारितां त्याचे आंगावर एकदां बंदूक झाडिली होती. त्या मनुष्यास बक्षीस देण्याकारितां त्यानें प्राण सोडिते समयीं कांहीं द्रव्य एकीकडे काढून ठेविलें होतें. आतां हा भाग बराच लांबला ह्मणून पुरा केला पाहिजे. डूक आफ वेलिंग्तन

# भाग पांचवा.

इ० स० १८१५ नंतर ड्यूक आफ् वेलिंग्तन ह्याचें बरेंच आयुष्य राज्यकारभारांत गेलें. किंबहुना, तो अगदीं थके पर्यंत दरबारी कामांत घोळत होता, असें ह्मटलें तरी चालेल. वातर्लू येथील लढाई आटोपल्यावर, पूर्वींच्या प्रसंगाप्रमाणें, ड्यूक आफ वेलिंग्तनावर मानपानांची आणि बहुमोल देणग्यांची केवळ वृष्टि झाली. नेदर्लंदच्या राजानें त्यास "प्रिन्स आफ वातर्लू" ही पदवी दिली; लंदनांतील एका मोठ्या राजमान्य सभेनें एक मोठी तरवार त्यास बक्षीस दिली; वातर्लूच्या समरांगणांत जी लूट झाली, तिचा वांटा ह्मणून त्यास ६,००,००० रुपये मिळाले; ह्याशिवाय साक्सनी, पोर्तुगाल, इत्यादि देशांच्या राजांनीं ज्या देणग्या दिल्या त्या वेगळ्याच. इंग्लंद, फ्रान्स, स्पेन, पोर्तुगाल, आस्त्रिआ, बेलजियम, रुशिआ, इत्यादि देशांच्या दरबारांमध्यें आणि लोकांमध्यें त्याची मोठी वाहवा झाली, आणि त्याच्या पराक्रमानें युरोपखंडास संकटापासून तारिलें, असें सर्वत्र बोलूं लागले. फ्रान्स, स्पेन, आणि रुशिआ येथील राजांनीं त्यास आपल्या लष्करांतील सर्वांत उंच ज्या पदव्या, त्या दिल्या. युरोपखंडामध्यें ड्यूक आफ वेलिंग्तन ह्याची ह्या वेळीं जशी मान्यता आणि प्रतिष्ठा झाली तशी मान्यता व प्रतिष्ठा पूर्वीं कधीं कोणाची झाली नव्हती. आणि खरोखर, नापोलियन बोनापार्तास पुरून उरण्यास

त्या प्रसंगीं, ईश्वरी संकेतानुरूप ड्यूक आफ वेलिंग्तन झाला होता, ह्मणून बरें झालें; नाहींतर त्या वेळीं युरोपच खंडाचें काय, पण त्या बरोबर आशिआ आणि आफ्रिका ह्या खंडांचें काय झालें असतें, आणि त्यांतील देशांची स्थिति आज कशी असती, ह्याचें अनुमान सुद्धां करवत नाहीं.

इंग्लंदच्या दरबारामध्यें ड्यूक आफ वेलिंग्तन ह्याचें चांगलें वजन पडलें; आणि त्यास इ० स० १८१८ मध्यें, तोफखान्यावर मुख्य अधिकारी नेमिलें. त्याच वर्षाच्या सप्तेंबर महिन्यामध्यें, युरोपांत शांतता राखण्याच्या उपायांचा विचार करण्याकरितां एक्सला चापेली येथें एक मोठी सभा भरली होती. तीस प्रुशिआचा राजा, आस्त्रिआचा बादशाहा, आणि रुशिआचा बादशाहा हे आले होते. तेथें इंग्लंदाच्या वतीनें ड्यूक आफ वेलिंग्तन व त्या बरोबर दुसरा एक पार्लमेंताचा सभासद असे गेले होते. त्या सभेमध्यें महत्वाचे असे पुष्कळ ठराव झाले. त्यांमध्यें एक असा होता कीं, फ्रान्स, देशाचा बादशाहा पुनः गादीवर बसून जिकडे तिकडे शांतता होत चालली आहे त्यापेक्षां, त्या देशांत जें परकीय राष्ट्रांचें सैन्य होतें तें त्यांतून एकदम जिकडील तिकडे लावून देऊन, तो देश पूर्ववत्, इतर देशांप्रमाणें स्वतंत्र करावा. हा ठराव होण्यापूर्वी, कोणीं अशी सूचना केली होती कीं, फ्रान्स देशांतल्या शांततेची शाश्वती वाटेपर्यंत, कांहीं वेळ पर्यंत बाहेरचें सैन्य त्यामध्यें तसेंच राहू द्यावें. आणि त्या सगळ्या सैन्याचें आधिपत्य ड्यूक आफ वेलिंग्तनाकडे होतें. आणि, तें सैन्य तसेंच तेथें ठेविल्यानें त्याला पुष्कळ द्रव्यलाभ होण्याचा संभव होता. ही गोष्ट त्याला विदित होती. तरी त्या मोहास तो वश झाला नाहीं. त्यानें फ्रान्सांतून सैन्य

काढून जिकडील तिकडे पाठविण्याविषयीं जो विचार मनांत आणिला, तो इतर सर्व सभासदांच्या मनांत भरवून सिद्धीस नेला.

इ० स० १८१९ त डूक आफ वेलिंग्तन ह्यास सरकारानें ग्रेमथचे गव्हरनर नेमिलें. आणि इ० स० १८२० त कर्नल इंचीफ आफ दि रैफल ब्रिग्रेद, ह्या अधिकारावर त्याची योजना केली. अशी डूक आफ वेलिंग्तन ह्याची दिवसानुदिवस बढती होत गेली.

इंग्लंदामध्यें पहिला चार्लस आणि दुसरा चार्लस ह्या राजांच्या कारकीर्दीपासून राज्यकार्यधुरंधर लोकांमध्यें दोन फळ्या झालेल्या आहेत; एकीचें नांव व्हिग आणि दुसरीचें नांव तोरी. हे दोन पक्ष उद्भवण्याचें मूळ कारण असें झालें होतें कीं, राजाची सत्ता आणि प्रजेचे हक्क ह्यांच्या मर्यादांविषयीं त्या राजांच्या वेळीं मोठमोठ्या खटपटी चालल्या होत्या. त्यांमध्यें जे लोक प्रजेच्या वतीनें बोलणारे होते, त्यांस व्हिग असें ह्मणत; आणि जे राजाच्या वतीनें बोलणारे असत, त्यांस तोरी ह्मणत. हा मूळ तटाचा काळ निघून गेल्यास आज जरी बरेच दिवस झाले आहेत, तरी, ते तट अद्याप मोडले नाहींत. हे दोन पक्ष नेहमीं एकमेकांच्या विरुद्ध असतात; आणि ते एकमेकांचा पाणउतारा करण्याविषयीं प्रयत्न करीत असतात. कोणी कोणी असें ह्मणतात कीं, असे दोन पक्ष देशामध्यें असले ह्मणजे त्याचें हित होतें. परंतु हें मत रास्त दिसत नाहीं. कुटुंबामध्यें कलह असला ह्मणजे जसें त्याचें काम बरोबर चालत नाहीं, तसेंच, अशा दुहीनें राज्यकारभार बरोबर चालावयाचा नाहीं, असें वाटतें. ह्या फळ्यांचें इंग्लंदामध्यें हल्लीं देखील एवढें प्राबल्य आहे

कीं, राजाचा मुख्य प्रधान व्हिग असला, ह्मणजे तो आपल्या हाताखालच्या मोठमोठया हुद्यांच्या जागा व्हिगपक्षाच्या लोकांस देतो. आणि, कांहीं कारणामुळें, मुख्य प्रधानकीच्या जागेवर तोरी आला, ह्मणजे नफ्या नुकसानाची परवा न करितां, मोठमोठ्या हुद्यांवर असलेले व्हिग भराभर राजीनामे देऊन मोकळे होतात; आणि पार्लमेंतामध्यें जाऊन, मुख्य प्रधानाकडून ज्या कांहीं सूचना विचाराकरितां आल्या असतात, त्या, नानाप्रकारच्या कोटिक्रमांनीं खंडून काढून, त्याचा पाणउतारा करितात. असें पांच चार वेळ झालें ह्मणजे, मुख्य प्रधान, कधीं कधीं आपली जागा सोडितो. अशा ज्या घालमेली इंग्लंदच्या दरबारामध्यें होतात त्यांची नुसती सरासरी कल्पना देखील आपणां साधारण माहितगार लोकांत नसते. ह्यामुळें, अशा प्रकारचीं तिकडचीं प्रकरणें समजण्यास कठीण पडतात. ड्यूक आफ वेलिंग्तन हा तोरी पक्षाचा होता. ह्यामुळें ज्या वेळीं प्रधानमंडळ त्या पक्षाचें होई तेव्हां त्याचें ह्मणणें मान्य होऊन, त्याला मोठेपण मिळे. आणि जेव्हां व्हिग पक्षाच्या लोकांस प्रधानकी मिळे, तेव्हां ह्याच्या ह्मणण्या प्रमाणें कांहीं होईना, आणि ह्याचा अपमान होऊन ह्यास कधींकधीं खालीं पाहावें लागे. अशा चढउतारांत ह्याचीं पुष्कळ वर्षें गेलीं. आणि त्यांत नाना प्रकारच्या लहानमोठ्या गोष्टी घडून आल्या. परंतु इंग्लंदच्या दरबारची तेव्हांची स्थिति, आणि तेव्हांच्या नानाप्रकारच्या प्रकरणांच्या घालमेली इकडील साधारण लोकांस माहीत नसल्यामुळें, त्यांची कच्ची हकीकत वाचकांस कंटाळवाणी वाटण्याची भीति आहे. ह्यास्तव त्या भरीस न पडतां, त्यांतल्या मुख्य मुख्य गोष्टी सांगून हा विषय आटपावा हें बरें दिसतें.

इ० स० १८२२ मध्यें व्हिरोना येथें कांहीं महत्वाच्या गोष्टींचा विचार करण्याकरितां युरोपांतल्या सर्व राष्ट्रांच्या वकीलांची सभा भरली होती. तिजमध्यें इंग्लंदाच्या वतीनें डूक आफ वेलिंग्तन हा आला होता. इ० स० १८२७ त त्यास इंग्लंदच्या राजानें आपणाकडील वकील नेमून, रूस देशाच्या बादशाहाच्या दरबारीं पाठविलें. त्याच वर्षी राजाच्या मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें क्यानिंग साहेबास मिळालीं. तेव्हां, इतर कितीएक मोठमोठ्या कामदारां बरोबर डूक आफ वेलिंग्तन ह्यानें आपले चाकरीचा राजीनामा दिला. असें करण्याचें कारण त्यास सरकारानें विचारिलें तेव्हां त्याचें उत्तर त्यानें असें केलें कीं, "मुख्य प्रधानकीची जागा मला मिळावयाची आशा राहिली नाहीं, ह्मणून मीं राजीनामा दिला असें नाहीं; तर ती जागा चालविण्यास मी असमर्थ आहें, हें मी पूर्णपणें जाणत आहें. त्या जागेची जर मी आशा केली असती, तर खरोखर माझें वेडेपण मात्र स्पष्ट दिसून आलें असतें, असें मी समजतों." पुढें क्यानिंग साहेब लवकरच मरण पावला; तेव्हां डूक ह्यानें लागलेंच पुन: सरकारी काम पतकरिलें. क्यानिंग साहेबाच्या मागें लार्ड गोदरिच हा मुख्य प्रधानकीचें काम कांहीं दिवस पाहात होता. त्याच्यानें तें बरोबर चालववेना; ह्मणून राजानें त्या जागेवर डूक आफ वेलिंग्तन ह्याची नेमणूक केली. त्याप्रमाणें त्यानें इ० स० १८२८ च्या जानेवारी महिन्याच्या आठव्या तारखेस आपलें नवें काम हातीं घेतलें. मांदर ह्मणून एक ग्रंथकार होऊन गेला, तो ह्याविषयीं एके ठिकाणीं असें लिहितो कीं, "ही जागा चालविण्याचें सामर्थ्य माझे ठायीं नाहीं, असें ह्या डूकानें नुकतें आठ

महिन्यांपूर्वीं स्पष्ट ह्मटलें होतें. तीच ही जागा त्यानें मोठ्या संतोषानें पतकरिली!" ह्या ठोमण्यांत कांहीं विशेष अर्थ आहे, असें आह्मांस वाटत नाहीं. तत्वज्ञानाची अथवा एकाद्या शास्त्रीय विषयाच्या विशेष परिज्ञानाची गोष्ट तूर्त एकीकडे असो; परंतु साधारण व्यवहारांतलीं जीं कामें प्रथम दर्शनीं फार कठीण आणि गहन अशीं दिसतात, तीं थोड्या दिवसांच्या अनुभवानें मध्यम बुद्धीच्या मनुष्यास देखील चांगल्या रीतीनें करितां येतात, ही गोष्ट हरहमेषा आपल्या दृष्टीस पडते. आणखी दुसरें असें आहे कीं, जे खरे विचारी आणि मार्मिक असतात, त्यांस त्यांच्या स्वतःच्या गुणापेक्षां त्यांचीं व्यंगें विशेष स्पष्ट दिसत असतात. ह्यामुळें त्यांस एकाद्या कामास एकदम धाडस करून हात घालवत नाहीं. आणखी, राजीनामा दिल्याच्या कारणामध्यें डूक आफ वेलिंग्तनानें जसें लिहिलें आहे, तसें, कोणत्याही एकाद्या कामाविषयीं आपल्या संबंधानें बोलणें हें नेमस्तपणाचें आणि लीनतेचें मोठें लक्षण आहे. ह्यास्तव, वर सांगितलेलें मांदर ह्याचें ह्मणणें अगदीं निरर्थक आणि पोरकटपणाचें आहे, असें ह्मणणें भाग पडतें.

डूक आफ वेलिंग्तन ह्यानें मुख्य दिवाणगिरीची जागा पतकरिली खरी; परंतु तिच्या योगानें त्यास सुख झालें नाहीं. कारण, त्या संधीस व्हिग पक्षाच्या लोकांचें प्राबल्य बरेंच वाढलें होतें; तेणेंकरून, जो जो विचार हा काढी, तो तो विचार ते हरप्रयत्न करून हाणून पाडीत. ह्याच्या मनाप्रमाणें एकही गोष्ट घडून येईना. तेस्त आक्त आणि कार्पोरेशन आक्त हे दोन कायदे रद्द करण्याची वाटाघाट तेव्हां चालली होती. ते रद्द होऊं नयेत, असें राजाचें

आणि डूक आफ वेलिंग्तन ह्याचें मत होतें; परंतु पार्लमेंता-मध्यें ते रद्द करण्याविषयीं बहुमत पडल्यामुळें ते रद्द झालें. आणि राजा व मुख्य दिवाण ह्यांचा हेतु एकीकडेस राहिला. दुसरें प्रकरण क्याथोलिक लोकांविषयीं जे कांहीं विशेष प्रतिबंध त्या काळीं होते, त्यांविषयीं निघालें. ते प्रतिबंध असणें हें योग्य आणि आवश्यक आहे, असें डूक आफ वेलिंग्तन ह्याचें मत फार दिवसांपासून होतें; व तें तो कधीं सोडावयाचा नाहीं, असें सर्व लोकांस वाटत होतें; परंतु, अनेक प्रकारच्या योग्य विचारांनीं तें त्याचें मत बदललें; आणि त्या लोकांविषयीं जे विशेष प्रतिबंध आहेत, ते दूर करावे, आणि त्यांस इतर लोकांप्रमाणें सगळे हक्क असावे, असें त्यानें आपलें नवें मत इ० स० १८२९ च्या फेब्रुआरी महिन्यांत प्रकट केलें. तें ऐकून लोकांस मोठें आश्चर्य वाटलें. आणि क्याथोलिक लोकांच्या विरुद्ध पक्षाकडचे लोक त्याला क्षणिक बुद्धीचा ह्मणूं लागले. अर्ल आफ् विंचेल्सी ह्या सरदारानें तर ह्याविषयीं एक लहानसें पुस्तक छापवून, त्यामध्यें डूक आफ वेलिंग्तनाची फार निंदा केली. ती डूक ह्यास सोसली नाहीं. त्यानें लागलेंच त्या सरदाराशीं द्वंद्व युद्ध करण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें ती वेळ प्राप्त झाली. त्या प्रसंगीं त्या सरदारानें आपलें पिस्तोल चुकवून वर उडविलें; आणि तेणेंकरून डूक आफ वेलिंग्तन ह्यास कांहीं इजा झाली नाहीं. ह्या प्रकरणासंबंधीं एके वेळीं भाषण करीत असतां डूक असें ह्मणाला कीं, "माझ्या देशांतील लोकांमध्यें आपसांत लढाई न होऊं देण्या प्रीत्यर्थ, इतर वस्तु तर काय, पण मी आपला प्राण देखील खरचीन." हे शब्द ऐकून कोणाही स्वदेशहितेच्छु मनुष्यास आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं.

ह्यानंतर पार्लमेंत सभेच्या सुधारणेचें प्रकरण निघालें. त्यांत डूक आफ वेलिंग्तन ह्याचें मत त्याच्या विरुद्ध होतें. ह्मणजे जी स्थिति आहे ती बरी आहे, हिजमध्यें फेरफार करण्याचें प्रयोजन नाहीं, आणि फेरफार करणें हें अशक्य आहे, असें त्यानें उघडपणें बोलून दाखविलें. त्याविषयीं दोन पक्ष होऊन मोठा वादविवाद चालला. दोहीं पक्षीं बोलणारे मोठे मोठे होते. त्यांची परस्परांशीं अगदीं लागून राहिली. डूक आफ वेलिंग्तनाच्या विरुद्ध जो पक्ष होता, तो फार मोठा होता, आणि सर्व साधारण लोक तिकडचे होते. त्यामुळें ह्यावेळीं त्यास फार त्रास होऊं लागला. आणि आपलें कांहीं चालत नाहीं, असें पाहून त्यानें आपल्या मुख्य दिवाणागिरीच्या जागेचा राजीनामा दिला. नंतर त्याच्या जागेवर राजानें अर्ल ग्रे ह्याची नेमणूक केली. अर्ल ग्रे हा मुख्य प्रधान असतां डूक आफ वेलिंग्तन ह्यानें कोणतेंही सरकारी काम पतकरिलें नाहीं. पार्लमेंताच्या सुधारणेविषयीं जो वाद चालला होता, त्यामध्यें मात्र तो विरुद्धपक्ष घेऊन मोठ्या आवेशानें आणि अगत्यानें प्रतिवाद करीत असे. त्याचें मत साधारण लोकांस अगदीं आवडत नसे. तेणेंकरून लोकांमध्यें त्याविषयीं पुष्कळ चर्चा होऊन इतकी अप्रीति उत्पन्न झाली कीं, त्याजवर भलभलतेच आरोप आणून, लंदन शहरच्या रस्त्यामध्यें त्यांनीं त्याची हुर्यो केली, आणि त्याच्या घरावर दगडांचा वर्षाव करून, खिडक्यांचीं भिंगें फोडून टाकिलीं ! नापोलियन बोनापार्तांचा पराभव करून सगळ्या युरोपखंडाचें रक्षण करणारा राजमान्य जो डूक आफ वेलिंग्तन ह्यास लंदन शहराच्या तमासगिरांनीं रस्त्यांत अद्वातद्वा बोलून दगडमार करावी काय ? हें जग प्रसंगानुरूप वागणारें आहे.

पार्लमेंताच्या सुधारणेच्या प्रकरणावरून डूक आफ वेलिंग्तन ह्याचा लोकांमध्यें जरी इतका अपमान झाला होता, तरी तो केवळ तेवढ्या पुरताच होता. तो प्रसंग निघून गेल्यावर, लोक त्याची पूर्ववत् स्तुति करूं लागले, आणि पहिल्या प्रमाणें त्यास चोंहीकडे मानप्रतिष्ठा मिळूं लागली. इ० स० १८३४ च्या जानेवारी महिन्यांत त्यास आक्सफोर्डच्या युनिव्हर्सितीचे चान्सलर नेमिलें. ही जागा द्रव्यप्राप्तीची नाहीं; परंतु मनुष्याचे ठायीं थोरपणा आणि विद्वत्ता हीं असल्यावांचून ही त्यास मिळत नसते. त्याच वर्षी लार्द मेल बोर्न ह्यानें आपल्या कामाचा राजीनामा दिल्यावर, विलियम राजानें मुख्य प्रधानकीचें काम पाहण्या करितां डूक आफ वेलिंग्तन ह्यास बोलावून आणिलें. परंतु तें तो पतकरीना. नंतर सर राबर्त पील हा मुख्य प्रधान झाला. तेव्हां डूक आफ वेलिंग्तन ह्यानें परदेशसंबंधीं राज्यांच्या कारभाऱ्याची जागा पतकरिली. पुढें एप्रिल महिन्यांत राबर्त पील ह्यानेंही प्रधानकीचें काम सोडिलें. त्याबरोबर डूक आफ वेलिंग्तनही आपलें काम सोडून मोकळा झाला. हें इ० स० १८३५ त घडलें.

इ० स० १८३७ त चवथा विलियम राजा मरण पावला, आणि त्याची पुतणी व्हिक्तोरिआ ही इंग्लंदाच्या सिंहासनावर बसली. तिच्या राज्याभिषेकाच्या समारंभास फ्रान्स देशांतून सूल्त हा आला होता. ह्याचे आणि डूक आफ वेलिंग्तनाचे दोन हात पूर्वी समरांगणांत झाल्याचें मागें वर्णिलेंच आहे. ह्या दोघां शूर पुरुषांची गांठ त्या राज्याभिषेकाच्या उत्सवांत पडली, तेव्हां वेलिंग्तनानें सूल्त ह्याचें उत्तम आगतस्वागत केलें. इ० स० १८४१ त सर राबर्त पील

ह्यास पुनः प्रधानकीचीं वस्त्रें मिळालीं. तेव्हां वेलिंग्तनानें पुनः प्रधानमंडळीमध्यें प्रवेश केला; परंतु वेगळें काम असें पतकरिलें नाहीं.

इ० स० १८४२ त, त्यास भेटण्या करितां महाराणीसाहेब वालमरक्यासल येथें गेल्या होत्या. त्याच वर्षी त्यास सेनापति नेमिलें. पुढें धान्याविषयींच्या कायद्याचा वाद निघाला. त्यामध्यें तो कायदा रद्द करण्याविषयीं ज्यांचा आग्रह होता, त्यांत ड्यूक होता. तो कायदा शेवटीं रद्द झाला. इ० स० १८४६ त सर राबर्त पील ह्यानें सरकारच्या दिवाणगिरीचें काम सोडिलें; तेव्हां ड्यूकही आपलें काम सोडून स्वस्थ घरीं राहिला.

ह्या वेळापासून मरणकालपर्यंत ड्यूक आफ वेलिंग्तन ह्यानें आपले दिवस स्वस्थपणांत घालविले. तरी तो पार्लमेंत सभेमध्यें वेळच्या वेळीं येऊन, स्वदेशाच्या हिताविषयींचे आपले विचार वारंवार प्रकट करीत असे. आपल्या देशामधलें लष्कर कसें असावें, आणि त्याची व्यवस्था कोणत्या प्रकारची असावी, ह्याविषयीं त्यानें पार्लमेंतामध्यें नानाप्रकारचीं भाषणें केलीं, आणि तीं सैन्याच्या सुधारणेस फार उपयोगीं पडलीं आहेत.

इ० स० १८५२ त त्यास ब्यायशींवें वर्ष लागलें. तोंपर्यंत त्याची प्रकृति अगदीं तरुणपणींच्या प्रकृतीप्रमाणें अरोग आणि सशक्त होती. "तो वर्षांनीं मात्र वृद्ध झाला होता, शरीरानें वृद्ध झाला नव्हता," असें एका ग्रंथकारानें ह्मटलें आहे, तें खरें आहे. त्यानें लहानमोठ्या शंभरएक लढाया मारिल्या, परंतु त्यांच्या योगानें त्याच्या सुदृढतेमध्यें एक तिळभर देखील न्यूनत्व आलें नाहीं. तो खाण्यापिण्यामध्यें

फार नेमस्त असे; ह्मणून त्याची प्रकृति अशी राहिली. त्याच्या प्रकृतीमध्यें आजारीपणाचें कांहीं एक लक्षण नसतां, रोजच्या प्रमाणें, तो इ० स० १८५२ च्या सप्तंबर महिन्याच्या तेराव्या तारखेस, रात्रीं, निजावयास गेला. दुसरे दिवशीं ह्मणजे १४ व्या तारखेच्या सकाळीं साहा वाजतां त्याचा नौकर, नित्याच्या परिपाठाप्रमाणें त्यास उठवावयास गेला. तेव्हां आंथरूणावरून न उठतां, वैद्यास लवकर बोलावून आणण्याविषयीं त्यानें त्यास सांगितलें. पुढें चार घटिकांनीं एकाएकीं त्याची वाचा बसली, आणि त्यास शुद्धि नाहींशी झाली. नंतर कांहीं औषधोपचार केल्यावर त्यास शुद्धि आली; परंतु तोंडांतून शब्द निघेना. तिसरे प्रहराचे सुमारास त्याची प्रकृति अधिक बिघडून त्याचा प्राण गेला. हें वर्तमान शहरांत समजलें तेव्हां लोकांस फार दुःख झालें. त्या प्रसंगीं व्हिक्टोरिआ राणी साहेब बालमारल वाड्यामध्यें होतीं. त्यांसही हें वर्तमान ऐकून फार वाईट वाटलें. आणि, जसा एकादा राजकुलांतला पराक्रमी पुरुष निवर्तावा, त्याप्रमाणें आपल्या कुटुंबामध्यें आणि लोकांमध्यें दुःखप्रदर्शन केलें. त्याच्या मरणासंबंधीं सरकारी रीतीनें जें छापून प्रसिद्ध केलें, त्यांत असें लिहिलें होतें कीं, "ह्यासारखा योद्धा इंग्लंदामध्यें अद्यापपर्यंत झाला नव्हता." आणखी राणीसाहेबांनीं आपल्या मुख्यप्रधानाच्या द्वारें असें प्रसिद्ध केलें कीं, ड्यूक ह्याच्या प्रेतक्रियेस फार मोठा मान द्यावा, आणि तत्संबंधीं सर्व खर्च सरकारी खजीन्यांतून करावा. त्याप्रमाणें, पार्लमेंत भरून, त्यास कोणकोणता मान कोण कोणत्या प्रकारें द्यावयाचा, व त्यास खर्च किती करावयाचा, ह्याविषयीं ठराव केला. आणि

मग सर्व गोष्टी त्याप्रमाणें घडून आल्या. त्याचें प्रेत मोठ्या समारंभानें लंदनशहरच्या रस्त्यांतून नेलें, तेव्हां, आज आपली मोठी हानि झाली, असें सर्व लोकांस वाटलें, असें त्यांच्या चर्यांवरून स्पष्ट दिसत होतें. तें प्रेत इ० स० १८५२ च्या नोवेंबर महिन्याच्या १८ व्या तारखेस, सेंतपाल नामक देवालयामध्यें, नेल्सनाच्या कबरीच्या शेजारीं पुरिलें. ह्या प्रकारें करून, जो केवळ आपल्या पराक्रमानें महत्पद पावला होता, ज्यानें आपलें सर्व आयुष्य स्वदेशहिताकरितां खरचिलें होतें, आणि ज्यानें सगळ्या युरोपखंडास नापोलियन बोनापार्ताच्या भयापासून आणि त्रासापासून मुक्त केलें होतें, त्याच्या आयुष्याची समाप्ति झाली. त्याला दोन पुत्र होते. येथें डूक आफ वेलिंग्तन ह्याचें चरित्र संपलें. आतां त्याच्या स्वभावाविषयीं एक दोन शब्द लिहून हा विषय पुरा करितों.

डूक आफ वेलिंग्तन ह्याच्या लहानपणच्या फारशा गोष्टी कोठें लिहिलेल्या दृष्टीस पडत नाहींत; तथापि, सरकारी नौकरी पतकरिल्यापासून जी त्याची कथा आपणांस माहीत आहे, तिजवरून, तो जबरदस्त उद्योगी, मोठा धैर्यशाली, हातीं घेतलेलें काम लक्षपूर्वक करणारा, आणि स्वदेशाच्या हिताविषयीं नेहमीं परम दक्ष राहणारा, असा होता, असें स्पष्ट दिसून येतें. इंग्लंद देशामध्यें ‘वज्रदेही डूक’ ह्या नांवानें हा प्रसिद्ध आहे. त्यास थकवा आणि वृद्धापकाल हा कधीं जाणवलाच नाहीं, ह्यावरून त्यास हें नांव पडलें होतें; तसेंच, त्याच्या मनाच्या अढळ निश्चयावरूनही हें नांव त्याला फार शोभत होतें. त्यानें ज्या अनेक लढाया मारिल्या त्यांमध्यें त्यास अपरिमित द्रव्य मिळण्यासारखें

होतें; परंतु त्यानें त्याजकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; एवढेंच केवळ नव्हे, तर, लुटीचा वांटा ह्मणून जो त्यास मिळत गेला, त्यांतलें पुष्कळ द्रव्य त्यानें आपल्या हाताखालच्या गरजू शिपायांस वांटून दिलें; ह्यावरून त्याची निर्लोभता दिसून येते; धोंड्या वाघ ह्याच्या मुलाच्या संरक्षणा करितां खासगी पैशापैकीं बरीच रकम त्यानें काढून दिली, ह्यावरून त्याच्या मनाचें थोरपण दिसून येतें; आणि नापोलियन बोनापार्तासारख्या विलक्षण शूर पुरुषाचा पराभव त्यानें केला, ह्यावरून त्याच्या शौर्याचें अनुमान सहज करितां येतें. एवढा निर्लोभ, एवढा थोर, आणि, एवढा शूर पुरुष इंग्लंद देशामध्यें होऊन गेला, आणि, त्यानें एके वेळीं सगळ्या युरोपखंडास वाघाच्या जबड्यांतून सोडविलें, हें इंग्लंद देशास अत्यंत भूषणप्रद होय. असे पुरुष देशामध्यें निर्माण झाल्याशिवाय त्यास ऊर्जित दशा प्राप्त व्हावयाची नाहीं. इतर शूर पुरुष आणि डूक आफ वेलिंग्तन ह्यांच्या मध्यें हें एक मोठें अंतर आहे कीं, इतर शूर पुरुष केवळ आपापल्या देशाच्या उपयोगीं पडले आहेत; आणि डूक हा सर्व युरोपखंडाच्या उपयोगीं पडला आहे; तेव्हां ह्याची योग्यता इतरांपेक्षां विशेष वर्णनीय आहे, असें सर्वांनीं कबूल केलें पाहिजे.




PRINTED AT THE EDUCATION SOCIETY'S PRESS, BYCULLA.